




लेखिका

**श्रीमती तारा चौधरी**

जयहिंद प्रकाशन

**रायकर ब्रदर्स पब्लिशिंग हाऊस प्रा. लि.**

२१२, क्रिएटीव्ह इंडस्ट्रियल सेंटर, ना.म. जोशी मार्ग,

लोअर परेल, मुंबई – ४०० ०११.

दूरध्वनी : २३०७ ५८६७ / २३०७ ५८९९

# अ नु क्र म णि का










भाग



१

## राजपुत्र

## ताज-उल-मुल्क



फार वर्षांपूर्वीची गोष्ट आहे. पूर्वदिशेला शिरकस्तान नावाच्या देशात झैन-उल-मुल्क नावाचा बादशहा राज्य करीत होता. त्याच्या राजधानीचे नावही शिरकस्तान होते.

शिरकस्तान हे फार मोठे नगर होते. शहराच्या मध्यभागी एक मोठा भव्य राजवाडा होता. त्या वाड्यात छप्पन्न रंगमहाल होते. ऐनेमहाल होता. सगळ्या महालांतून उत्तम नक्षीकाम केले होते. मोठमोठ्या चित्रकारांकडून महालांत चित्रे रंगविली होती. ठिकठिकाणी उत्तम मूर्ती बसविल्या होत्या. वाड्यात ठिकठिकाणी फुलांची झाडे व वेली ठेविल्या होत्या आणि त्याच्या अंगणात कारंजी उडत होती.

राजवाड्याच्या बागेत निरनिराळी झाडे होती. त्यांना फळे आली होती. फुलवेलींनी तर बाग बहरून गेली होती. त्या बागेत मोर, पोपट यांसारखे सुंदर पक्षी व हरीण, सशांसारखे पाळीव पशू इकडेतिकडे फिरत असताना पाहिले म्हणजे पाहणाराला अत्यंत आनंद होत असे.

अशा राजवाड्यातून बादशहा झैन-उल-मुल्क आपल्या देशाचा राज्यकारभार पाहात असे. त्या शहरात फार मोठा व्यापार चालत असे. देशोदेशीचे व्यापारी, जवाहिरे तेथे येत व आपल्या मालाची खरेदी-विक्री करीत. त्यामुळे शहर नेहमी गजबजलेले असे.

झैन-उल-मुल्क हा फार चांगला बादशहा होता. तो प्रजेची आपल्या मुलांप्रमाणे काळजी वाहात असे. त्याचा सरकारी अधिकारी व नोकरवर्ग यांवर चांगलाच वचक होता. त्यामुळे त्यांच्याकडून प्रजेचा छळ होत नसे. लोक अगदी आनंदात व चैनीत होते. सारी जनता बादशहाला दुवा देत होती.

बादशहाला चार पुत्र होते. ते चारही पुत्र फार सुंदर होते, हुशार होते. लहान वयातच त्यांनी सर्व विद्या संपादन केल्या, चौसष्ट कलांचे शिक्षण घेतले आणि घोड्यावर बसणे, तलवार चालविणे, नेम मारणे वगैरे युद्धकलेचे शिक्षण घेऊन त्यातही ते तरबेज झाले.

एक दिवस उगवला आणि बादशहाला पाचवा पुत्र झाला. हे बाळ जन्मत:च फार सुंदर होते. त्याचे डोळे तेजस्वी होते. त्याच्या गालावर एक तीळ असून तो फारच सुंदर दिसत होता. चंद्रसूर्याप्रमाणे त्याच्या चेहऱ्याचे तेज फाकले होते. ही बातमी बादशहाला कळली. त्याला खूप आनंद झाला. त्यावेळी सारी राजधानी शृंगारली. हत्तीवरून साखर वाटली. वाद्यांचा गजर झडू लागला. नाचगाणी होऊ लागली आणि गोरगरिबांसाठी खजिना खुला केला गेला. सारी राजधानी आनंदाच्या लाटेवर नाचू लागली. जिकडेतिकडे आनंदीआनंद ओसंडू लागला.

ताबडतोब बादशहाने ज्योतिष्यांना बोलाविले. ज्योतिषी आले. त्यांनी बादशहाच्या नवीन मुलाच्या कुंडल्या मांडल्या.

विचार केला आणि बादशहाला सांगितले, 'सरकार, हे पुत्ररत्न फार थोर होणार आहे. तो सम्राट होईल. लक्ष्मी त्याच्या घरी पाणी भरील. राक्षस, अप्सरा, यक्ष यांच्यावरही त्याचा अधिकार चालेल. आपण त्याचे नाव ताज-उल-मुल्क असे ठेवावे.'

बादशहाला भविष्य ऐकून खूप आनंद झाला. इतक्यात एक वृद्ध ज्योतिषी पुढे झाला आणि म्हणाला, ''सरकार, या मुलाचे आणखी भविष्य आहे आणि त्याचा प्रत्यक्ष आपणाशी संबंध आहे. ते भविष्य वाईट आहे. ते सांगणाराला आपण प्राणदंडाची शिक्षा द्याल.'' बादशहा म्हणाला, ''खरे ते सांगा! काही भिऊ नका. आपणाला मुळीच शिक्षा होणार नाही!''

ज्योतिषी म्हणाला, ''सरकार, आपला मुलगा सर्वगुणसंपन्न आहे, पण त्याचे ज्यावेळी आपण दर्शन घ्याल त्यावेळी आपली दृष्टी जाऊन आपण आंधळे व्हाल!''

हे ऐकून बादशहाला खूप वाईट वाटले. पण त्याला उपाय नव्हता. ज्योतिष्यांना भेट बक्षिसी देऊन बादशहाने त्यांना रवाना केले आणि पुढे येणारे संकट टाळावे म्हणून त्याने लगेच उपाययोजना केली. एका अरण्यात एक महाल बांधला व त्यात ताज-उल-मुल्क व त्याची आई ह्यांची रवानगी केली. तेथे त्यांची उत्तम व्यवस्था केली आणि मुलाच्या शिक्षणाची संपूर्ण सोय केली.

राजपुत्र दिवसेंदिवस मोठा होत चालला. त्याचे शिक्षण सुरू झाले. तो सर्व विद्या-कलांत निपुण झाला. युद्धकलेत तरबेज झाला. तो आता रानात शिकारीला जाऊ लागला. वाघसिंहासारख्या क्रूर प्राण्यांची शिकार करू लागला.

घोड्यावर स्वार होऊन शिकार करणे हा त्याचा दररोजचा कार्यक्रम ठरून गेला होता.

कर्मधर्मसंयोगाने एके दिवशी बादशहा झैन-उल-मुल्कही त्याच अरण्यात थोड्याशा सैन्यासह शिकारीला आला आणि जे घडू नये तेच नेमके घडले. एक सुंदर तेजस्वी तरुण, घोड्यावर स्वार झालेला, हाती धनुष्यबाण घेतलेला असा बादशहाच्या नजरेस पडला. हा राजबिंडा तरुण कोण असावा असे वाटून आश्चर्यचकित मुद्रेने बादशहा त्याच्याकडे पाहू लागला आणि पाहता पाहता त्याची दृष्टी नाहीशी झाली. बादशहा आंधळा झाला.

हा आपला पाचवा पुत्र ताज-उल-मुल्कच असला पाहिजे अशी बादशहाची खात्री झाली. कारण ज्योतिष्यांनी त्याला जे सांगितले होते ते त्याला आठवले. बादशहाला फार वाईट वाटले. त्याला त्या पुत्राचा राग आला. तो लगेच प्रधानास म्हणाला, ''हाच तो माझा कुपुत्र. ज्योतिष्यांचे भविष्य खरे ठरले. मी आंधळा झालो. ह्याला ताबडतोब राज्याबाहेर घालवून द्या आणि त्याच्या आईला आमच्या जनानखान्यात दासीचे काम द्या.''

लगेच प्रधानाने राजपुत्राला कैद करून राज्यातून हद्दपार करण्यासाठी रवाना केले आणि त्याच्या आईची दासी म्हणून राण्यांच्या महालात रवानगी केली.





भाग
२



# चार राजपुत्र
# गुलबकावलीच्या शोधासाठी



बादशहा राजवाड्यात परत आला आणि आंधळेपणाने आपले जीवन जगू लागला. एके दिवशी सर्व राज्यात दवंडी पिटली गेली. ''लोकहो ऐका! आपले राजे झैन-उल-मुल्क हे आंधळे झाले आहेत. त्यांच्या डोळ्यांवर जो कोणी उपचार करील व त्यांना पुन्हा दृष्टी मिळवून देईल त्याला अर्धे राज्य बक्षीस देण्यात येईल हो!''

दवंडी ऐकून अनेक वैद्य, हकीम, मांत्रिक राजवाड्यात गेले. त्यांनी अनेक उपचार केले, पण काही गुण येईना. एके दिवशी एक परदेशी हकीम त्या राजधानीत आला. तो हकीम वैद्यकशास्त्रात हुशार होता. राजधानीत प्रथम त्याला बादशहा आंधळा झाल्याची बातमी समजली.

दुसऱ्या दिवशी तो हकीम दरबारात गेला आणि वजिराला म्हणाला, ''मी परदेशी हकीम आहे. मला असे कळले आहे की, बादशहांना नुकतेच अंधत्व प्राप्त झाले आहे. मला संधी द्याल तर मी नीट परीक्षा करीन आणि काहीतरी उपाय सुचवीन.''

वजिराला हकिमाचा विचार पसंत पडला. त्याने बादशहाची परवानगी घेतली आणि हकिमाला राजमहालात नेले. त्या हकिमाने बादशहाचे डोळे तपासले आणि विचार करून तो म्हणाला, ''सरकार, आपली दृष्टी परत येण्याला फक्त एकच उपाय आहे, आणि तो म्हणजे गुलबकावलीचे

फूल. ते डोळ्यांना लावताच आपल्याला दिसू लागेल. त्याशिवाय दुसरा कोणताही इलाज नाही पण -''

''पण काय ?'' बादशहाने चटकन विचारले.

हकीम म्हणाला, ''सरकार, ते फूल मिळविण्यासाठी अनंत कष्ट झेलावे लागतील. त्या प्रयत्नांत कार्हींचे प्राणही जातील.''

लगेच दुसऱ्या दिवशी बादशहाने सर्व राज्यात दवंडी पिटविली की, 'जो कोणी बादशहाला गुलबकावलीचे फूल आणून देईल त्याला फार मोठे इनाम दिले जाईल होऽऽ...'

गुलबकावलीचे फूल मिळविणे सोपे नव्हते. त्याचे नावही अनेकांनी ऐकले नव्हते. बरेच दिवस गेले पण त्या फुलाचा पत्ताही कुणी देऊ शकले नाहीत. त्यामुळे दुःखाने बादशहाच्या डोळ्यांतून अश्रू वाहात होते.

अखेरीस एके दिवशी चारही राजपुत्र बादशहापुढे उभे राहिले आणि हात जोडून म्हणाले, ''अब्बाजान, आम्ही गुलबकावलीच्या फुलाच्या शोधार्थ जातो. आपली आज्ञा असावी.''

बादशहा म्हणाला, ''बाबांनो, मी अगोदरच माझी दृष्टी घालवून बसलो आहे. तुम्ही निघून गेल्यावर मी एकटा काय करू ?''

पण काही झाले तरी राजपुत्र ऐकायला तयार नव्हते. शेवटी नाइलाजाने बादशहाने त्यांना परवानगी दिली. बादशहाला नमस्कार करून चौघे भाऊ गुलबकावलीच्या फुलाच्या शोधार्थ प्रवासाला निघाले.

मजल-दरमजल कूच करीत राजपुत्र निघाले. रस्त्यात त्यांना भयंकर अरण्य लागले. मोठमोठ्या संकटांशी सामना करीत व हालअपेष्टा सोशीत चौघेही पुढे चालले. त्याच वेळी

त्याच रस्त्याने ताज-उल-मुल्कही जात होता. त्यांची भेट झाली, पण ते एकमेकांना ओळखू शकत नव्हते. ताज-उल-मुल्कने त्यांची चौकशी केली. तेव्हा त्याला त्या राजपुत्रांकडून आपले वडील आंधळे झाले असल्याचे कळले आणि ते गुलबकावलीच्या फुलाच्या शोधाला निघाले आहेत हे समजले.

ताज-उल-मुल्क विचारात पडला. तो मनात म्हणाला, 'काय योगायोग आहे पहा! मला आपले नशीब पारखण्याची संधी मिळते आहे. ती का न घ्यावी? गुलबकावलीचे फूल आपण प्राप्त करू शकलो तर? वडिलांचा आपल्यावर झालेला रोष जाईल! आपल्यामुळेच वडील आंधळे झाले आहेत. त्यांना बरे करणे हे आपले कर्तव्यच ठरते.' ह्या कल्पनेने त्याला आनंद वाटला आणि त्या मंडळींतील एका सरदाराशी त्याने मैत्री करण्याचा प्रयत्न केला. त्याचे नाव होते सैयद.

ताज त्या सरदाराजवळ गेला आणि त्याने त्याला सलाम केला. हा सूर्यासारखा तेजस्वी तरुण पाहून सरदार चकित झाला. तो म्हणाला, "तू कोण आहेस? आणि अशा अरण्यात एकटा कसा?"

काही झाले तरी आपली ओळख येथे कोणालाही द्यावयाची नाही असे ताजने ठरविले. मग तो म्हणाला, "मी एक गरीब मुसाफिर आहे. मला कोणाचाही आधार नाही. जो माझ्या पोटाला देतो त्याची मी सेवा करतो. आपण मला सहारा द्याल तर माझ्यावर उपकार होतील."

सैयदला त्याची गरिबी व नम्रता पाहून दया आली आणि त्याने त्याला आपल्याजवळ ठेवून घेतले.

चालता चालता हा तांडा काही दिवसांनंतर फिरदोश नावाच्या शहरात येऊन पोहोचला. राजपुत्रांनी शहराच्या बाहेर नदीकाठावर आपला मुक्काम ठोकला. बरेच दिवसांच्या जंगलपहाडांच्या प्रवासाला राजपुत्र कंटाळले होते. शहराची शोभा पाहावी म्हणून ते घोड्यावर स्वार झाले आणि शहरात जायला निघाले. शहरात ते निरनिराळ्या रस्त्यांनी फेरफटका मारू लागले.

फिरता फिरता ते एका आलिशान महालाजवळ येऊन पोचले. एखाद्या राजाच्या महालाला मागे सारील असा त्याचा डौल होता. राजपुत्र त्या महालाकडे पाहातच राहिले. एका राजपुत्राने एका माणसाला विचारले, ''काय हो गृहस्थ! हा महाल आहे तरी कोणाचा?''

तो गृहस्थ म्हणाला, ''हा महाल एका कलावंतिणीचा आहे. ती अत्यंत सुंदर आहे आणि पुरुषांना वश करून घेण्यात फार हुशार आहे. तिच्या हातून सुखरूप कुणीही परतला नाही. अनेकजण सर्व दौलत घालवून गेले. अनेक तिच्यासाठी वेडे झाले. अनेक तिच्यामुळे भिकारी झाले.''

चारही राजपुत्र त्या महालाकडे गेले. दारावर नगारा ठेवला होता. त्यांनी त्यावर चोप मारली. तोच महालाचा दरवाजा उघडला. एक सेवक बाहेर आला. तो राजपुत्रांना रंगमहालात घेऊन गेला.

ह्या चारही राजपुत्रांना आपल्या संपत्तीचा फार गर्व चढला होता. आपले यावेळी कोणते कर्तव्य आहे हे त्यांना काहीच कळत नव्हते. ते इश्काच्या नशेने उल्लू झाले होते.

त्या राजपुत्रांचे त्या महालात चांगलेच स्वागत झाले. तेवढ्यात नटलेली, सजलेली एक लावण्यवती स्त्री समोर आली आणि मंचकावर बसली. तिच्याकडे पाहताच ते चौघेही

तिच्या सौंदर्यावर मोहून गेले. आपले देहभान विसरले. तिच्या एका नेत्रकटाक्षाने चौघांची हृद्ये खलास झाली होती.

त्या लावण्यवतीने मदिरेचे पेले त्यांच्यापुढे केले. ते रत्नजडित पेले हाती पडताच त्या चौघा राजपुत्रांनी ते फस्त केले. आता गप्पागोष्टींना, थट्टामस्करीला रंग भरू लागला.

राजपुत्रांवर दारूचा अंमल पूर्णपणे बसला होता आणि त्या लावण्यवतीला हवी ती संधी आता मिळाली होती. तिने त्यांना द्यूत खेळण्यास सांगितले. तेव्हा चौघा राजपुत्रांनी ताबडतोब होकार दिला.

सारीपाट मांडला. ती लावण्यवती व राजपुत्र खेळायला बसले. तेथे एक मांजर आणण्यात आले. त्याच्या डोक्यावर एक दिवा ठेवला होता. दारूच्या धुंदीत दिवा कोठे ठेवला आहे इकडे राजपुत्रांचे लक्ष नव्हते. हा हा म्हणता लाखो रुपये त्या स्त्रीने राजपुत्रांकडून जिंकून घेतले. ती रात्र जुगारात गेली. दिवस उगवला आणि ते राजपुत्र आपल्या मुक्कामावर गेले.

दुसऱ्या दिवशी रात्री त्या लावण्यवतीकडे जाण्याची ओढ राजपुत्रांच्या मनाला लागली. बरोबर घेता येईल तेवढी धनदौलत घेऊन ते त्या लावण्यवतीच्या महालात आले.

कालच्यापेक्षाही आज त्यांचे स्वागत चांगले झाले. लावण्यवती स्वत: त्यांच्याबरोबर फराळ करू लागली. भोजनानंतर मद्यपानाचा कार्यक्रम उरकला आणि पुन्हा जुगाराला आरंभ झाला.

एक-दोन डावांतच राजपुत्रांजवळील रुपये, मोहरा उडाल्या. मग त्यांनी हत्ती, घोडे वगैरे वस्तू जुगारावर लावल्या आणि त्याही त्या लावण्यवतीने जिंकून घेतल्या. आता राजपुत्र दरिद्री झाले होते. दरिद्र्याला येथे स्थान नाही म्हणून तिने त्यांना आपल्या घरी जाण्यास सांगितले.

राजपुत्रांना हा आपला फार मोठा अपमान वाटला. ते म्हणाले, ''आम्ही सर्व काही हरलो नाही. आम्ही स्वत:ला पणाला लावतो. अजून एक डाव खेळूया. एका बाजूला तुझी दौलत व दुसऱ्या बाजूला आम्ही चार भाऊ. आम्ही जिंकलो तर तुझी सर्व दौलत आमची होईल आणि हरलो तर तुझे दास म्हणून तुझी सेवा करू.''

डाव सुरू झाला आणि राजपुत्र तोही डाव हरले. ते गुलाम झाले आणि तिच्या गुलामखान्यात जाऊन पडले. दिवस उगवताच तिने सर्व तळाचा ताबा घेतला आणि सर्व सरदार व शिपायांना दाही दिशांना हाकून दिले.

❀ ❀ ❀

## भाग ३

## ताज-उल-मुल्कने दिलवरला जिंकले

इतर शिपायांची जी वाट लागली तीच वाट ताज-उल-मुल्कचीही लागली. भावांच्या मूर्खपणामुळे त्याला त्यांचा राग आला. तो मनाशी विचार करू लागला, 'आता काहीही उपाय करून भावांची सुटका केली पाहिजे.'

ताज दुसऱ्या दिवशी उठला आणि शहरात फिरायला निघाला. फिरता फिरता तो एका मोठ्या हवेलीपुढे येऊन थांबला. त्या महालात जाऊन तो एका श्रीमंत माणसापुढे उभा राहिला. त्याने त्याला अदबीने मुजरा केला. तो श्रीमंत माणूस ताजकडे पाहातच राहिला. तो मनात म्हणाला, 'वा वा! काय सुंदर आहे हा तरुण!'

त्या श्रीमंताने त्याला बसायला सांगितले. तो म्हणाला, "आपण कोण? कोठून आलात?" राजपुत्र म्हणाला, "महाराज, मी परदेशी प्रवासी देश भटकत आहे. आपली कीर्ती ऐकून आपली सेवाचाकरी करावी या उद्देशाने मी आलो आहे. तरी कृपा करून मला आश्रय द्यावा."

राजपुत्राचे नम्रपणाचे भाषण ऐकून तो श्रीमंत गृहस्थ त्याच्यावर खूष झाला आणि त्याने राजपुत्राला आपल्याकडे नोकरीला ठेवून घेतले. आपले कसब व इमानदारी दाखवून राजपुत्र त्या गृहस्थाच्या अगदी विश्वासातला होऊन बसला आणि त्या श्रीमंत माणसाचा सल्लागार झाला.

काही दिवस निघून गेल्यावर राजपुत्र आपल्या उद्योगाला लागला. त्याने त्या लावण्यवतीची सगळी चौकशी केली. ती जुगारात तरुणांना नागविते असे त्याला कळले आणि प्रथम आपण जुगारात तरबेज झाले पाहिजे, असे त्याने ठरविले. आतापर्यंत नोकरीतून काही पैसा त्याने जमा केला होता. त्यातून थोडे थोडे पैसे घेऊन तो जुगाराच्या अड्ड्यावर रोज जाऊ लागला. थोड्या दिवसांतच तो जुगारात पटाईत झाला.

अशाप्रकारे आपली तयारी करून राजपुत्र त्या दिलवर नावाच्या लावण्यवतीकडे जायला निघाला. तो तिच्या वाड्यात शिरणार होता, पण त्याच वेळी एक म्हातारी स्त्री बाहेर आली. राजपुत्रही लगेच मागे फिरला आणि त्या म्हाताऱ्या स्त्रीच्या पाठीमागून निघाला.

ती घरी गेली आणि राजपुत्रही तिच्या मागोमाग तिच्या घरी पोहोचला. त्याने तिचे पाय धरले आणि तो मोठमोठ्याने रडू लागला. तेव्हा ती म्हातारी म्हणाली, "बाबारे, तू कोण, कोठला? असा रडतोस का?"

राजपुत्र म्हणाला, ''मी एक गरीब मुसाफिर आहे. मी फार दु:खी आहे. संकटाने बेजार झालो आहे. दु:खाने भाजून निघालो आहे. हे जिणे मला नकोसे झाले आहे. हे आई! ह्या शहरात मी एकटाच आलो आहे. मला ना कुणी मित्र, ना दोस्त. कुणाची मदत नाही, कुणाचा आसरा नाही.

पूर्वेच्या दिशेला माझा देश आहे. माझी एक आई होती, पण ती मला टाकून गेली. तुझा चेहरा माझ्या आईसारखा आहे. मला तिची आठवण आली म्हणून मला रडे कोसळले आणि मी तुझे पाय धरले. मला अनाथाला तू पदरात घे. आधार दे. मी तुझी सख्खी आई समजून सेवाचाकरी करीन. माझा सांभाळ कर.''

राजपुत्राच्या अशा लाघवी बोलण्याने म्हातारीचे हृदय द्रवले. ती म्हणाली, ''हे तरुण गृहस्था, तू कोण, कुठला हे मला काही कळले नाही; पण तुझ्या बोलण्याने मला तुझ्याबद्दल प्रेम वाटू लागले आहे. मलाही या जगात कोणी नाही. आता यापुढे मी तुझी आई आणि तू माझा मुलगा.''

आपला मंत्र लागू पडला, आता काही तरी मार्ग निघेल याबद्दल राजपुत्राला आशा वाटू लागली. इकडच्या तिकडच्या गप्पागोष्टी झाल्यावर राजपुत्र त्या म्हातारीला म्हणाला, ''आई, मी ह्या शहरात एका श्रीमंत माणसाकडे नोकरीला आहे. त्याची नोकरी केली पाहिजे. मी आता जातो. जेव्हा जेव्हा वेळ मिळेल त्या त्या वेळी मी इकडे येईन.''

राजपुत्र इतके सांगून म्हातारीची रजा घेऊन निघून गेला. जरी त्याने त्या म्हातारीला सांगितले होते की, मी रोज येऊ शकणार नाही तरी तो दररोज न चुकता तिच्याकडे जाऊ येऊ लागला. तिच्याशी तो गोड बोले. तिची सेवाचाकरी करी. ती म्हातारी राजपुत्रावर अगदी खूष होती.

अशाप्रकारे ती म्हातारी आपल्यावर खूष झाली आहे, आपल्यावर तिचा विश्वास बसला आहे याची राजपुत्राला खात्री वाटली आणि एके दिवशी त्याने हळूच गोष्ट काढली, ''आई, तू दररोज त्या दिलवरकडे जातेस. तिची कीर्ती ह्या शहरात फार मोठी आहे. मी ऐकले आहे, ती स्त्री द्यूत खेळण्यात फार पटाईत आहे. आजपर्यंत तिला कोणीच जिंकू शकला नाही. जो आला तो हरला. कुणी वेडे झाले, तर कुणी तिच्या कैदेत पडले. काय कारण बरे याचे? तुला हे गुपित जरूर माहीत असले पाहिजे.''

राजपुत्राचे हे भाषण ऐकून ती म्हातारी प्रथम चमकलीच. ती म्हणाली, ''बाबारे, त्या भानगडीत तू पडू नकोस. ती भयंकर स्त्री आहे. तिच्या जुगाराचे गुपित जर का बाहेर फुटले तर ती माझा निकाल लावील.''

त्यावर ताज-उल-मुल्कने त्या म्हातारीचे पाय धरले. तो म्हणाला, ''आई, अल्लाची कसम! मी कोणाजवळही ते गुपित फोडणार नाही. तुझी शपथ. कोणाजवळ बोलणारही नाही. पण तू ते मला सांगच.'' ताजने म्हातारीजवळ हट्टच धरला.

हो नाही म्हणता म्हणता शेवटी म्हातारी ते गुपित सांगायला तयार झाली. ती म्हणाली, ''बाबारे, ही गोष्ट कुठेही बोलू नकोस हो! हे बघ, त्या दिलवर नावाच्या स्त्रीजवळ एक मांजर व एक उंदीर पाळलेला आहे. खेळ चालू असताना ती मांजराला आपल्याजवळ बसविते व त्याच्या डोक्यावर दिवा ठेवते. उंदराला अंगावरील शालीमध्ये लपवून ठेवते. खेळताना बाजू तिच्यावर उलटत असलेली तिने पाहिली की, ती मांजराला खूण करते. त्याबरोबर ते मांजर अशी काही हालचाल करते की, त्यामुळे पटावर अंधार पडतो. त्याच

अंधारात तिच्या शालीतून उंदीर बाहेर येतो आणि पटावरील सोंगटी हवी तशी सरकवून चटकन शालीत लपून बसतो. हे आहे तिचे गुपित.''

हे गुपित ताज-उल-मुल्कला कळले. मग तो बाजारात गेला आणि मुंगुसाचे एक पिलू विकत घेऊन आला. त्याला तो आपल्या अंगरख्याच्या बाहीत लपवून ठेवीत असे. ताजने त्याला अशा प्रकारचे शिक्षण दिले की, त्याने चुटकी वाजविल्याबरोबर ते पिलू त्याच्या बाहीतून चटकन उडी मारून बाहेर येई.

याप्रमाणे मुंगुसाला शिकवून तयार केल्यावर दिलवरशी त्याने दोन हात करण्याचे ठरविले. म्हातारीकडून त्याने व्यापाराच्या निमित्ताने थोडे पैसे घेतले. तो आपल्या मालकाकडे गेला आणि म्हणाला, ''महाराज, माझ्या ओळखीचा एक सरदार आहे. आज त्याचे लग्न आहे. मला लग्नाला जायचे आहे. माझी आपणाला नम्र विनंती आहे की, आपला एखादा जुना पोशाख असेल तर तो मला द्यावा. मी तो घालून लग्नाला जाईन.''

मालकाने त्याला आपल्या पोशाखांपैकी एक उत्तम पोशाख दिला, एक उत्तम घोडा दिला आणि ऐटीत लग्नाला जायला सांगितले.

संध्याकाळ झाली आणि ताज-उल-मुल्क नटून सजून घोड्यावर स्वार होऊन, लाख रुपयांची थैली कमरेला लावून दिलवरच्या वाड्याजवळ आला. त्याने घोडा तेथील बागेत सोडला आणि चोप घेऊन नगारा जोराने वाजविला. लगेच एक नोकर आला आणि राजपुत्राला सन्मानाने आत घेऊन गेला.

दिलवरही नटून सजून बसली होती. ती उभी राहिली. हा राजबिंडा तरुण पाहताच ती त्याच्यावर आशक झाली. राजपुत्र तिला म्हणाला, ''तुझी कीर्ती ऐकून मी तुझ्याकडे आलो आहे. तू पृथ्वीवर सर्वांत सुंदर स्त्री आहेस. तुझ्याकडे दूरदूरचे राजे, राजपुत्र, सरदार, सावकार येतात. त्यांचे तू उत्तम स्वागत करतेस असे मी ऐकले आहे.''

दिलवर म्हणाली, ''महाराज, आपले जरूर स्वागत होईल.'' असे म्हणून तिने त्याचा हात धरला व त्याला आसनावर बसविले. तिने त्याचे चांगले स्वागत केले. तेव्हा तो म्हणाला, ''मी असे ऐकले आहे की, तू सारीपाट खेळण्यात फार पटाईत आहेस. आजपर्यंत तुला कोणीही जिंकले नाही. तर तुझ्याशी दोन डाव खेळावे अशी माझी इच्छा आहे.''

दिलवर चटकन् तयार झाली आणि सारीपाटाची सर्व तयारी करण्याचा तिने नोकरांना हुकूम केला.

डाव सुरू झाला. पहिला डाव राजपुत्राने दिलवरला जिंकू दिला; पण दुसऱ्या डावापासून त्याची भराभर जीत सुरू झाली. तिने मनाशी ओळखले की, हा गृहस्थ द्यूत खेळण्यात चांगलाच तरबेज आहे. मग तिने आपली युक्ती लढवायचे ठरविले. तिने मांजराला खूण केली. त्याच्या हालचालीमुळे त्याच्या डोक्यावरील दिवा हलला. सारीपाटावर अंधार पडला. इतक्यात तिने आपल्या शालीतून उंदीर बाहेर सोडला.

राजपुत्राने एकूण रागरंग ओळखला. तो सावध होताच. त्याने ताबडतोब चुटकी वाजविली आणि मुंगूस त्याच्या बाहीतून बाहेर आले. मुंगुसाला पाहताच उंदीर जीव घेऊन पळाला. मांजरही भिऊन आपल्या डोक्यावरील दिवा टाकून पळून गेले.

आपले कपट ओळखले गेले हे पाहून दिलवर घाबरली. राजपुत्राला तिचा राग आला. तो क्रोधाने म्हणाला, ''हे कपटी स्त्रिये, असा धोका देऊन आणि फसवून तू द्यूत जिंकतेस काय? चल, आण दुसरा दिवा आणि पुन्हा खेळायला सुरुवात कर.''

तिची आता यापुढे खेळ चालवण्याची मुळीच इच्छा नव्हती; पण राजपुत्रापुढे ती नाही म्हणू शकत नव्हती. तिने समई मागविली व तिच्या प्रकाशात पुन्हा सारीपाटाचा डाव सुरू झाला.

सकाळ होण्याची वेळ आली आणि राजपुत्र म्हणाला, ''हे सुंदरी, मला आता माझ्या कामाला गेले पाहिजे. आता खेळ बंद करूया. मी रात्री पुन्हा येईन व पुन्हा आपला खेळ सुरू होईल.''

असे सांगून तो उठला. सात कोटी रुपयांची संपत्ती त्याने दिलवरकडून जिंकली होती. ती सारी दौलत त्याने तेथेच सोडली आणि आपल्या मालकाकडे कामाला गेला. केवढा विश्वास ठेवला त्याने दिलवरवर!

दिवस त्याने कसातरी काढला. संध्याकाळ झाली आणि तो दिलवरच्या वाड्यात येऊन दाखल झाला. आज स्वत: दिलवरच राजपुत्राच्या स्वागतासाठी दारावर उभी होती. तिने त्याला रंगमहालात नेऊन रत्नजडित खुर्चीवर बसविले. फराळपाण्याची व्यवस्था केली. थोड्या गप्पागोष्टी झाल्या आणि राजपुत्र म्हणाला, ''हे सुंदरी, चल द्यूताची तयारी कर.''

आज दिलवर जुगार खेळायला तयार नव्हती. पण राजपुत्रापुढे तिचे काही चालेना. शेवटी तिला तयार व्हावे

लागले. पुन्हा सोंगट्यांचा डाव सुरू झाला; पण आज तेथे ते मांजर नव्हते आणि उंदीरही नव्हता.

मध्यरात्रीपर्यंत राजपुत्राने तिची सर्व संपत्ती जिंकून घेतली. प्रत्येक डाव तो जिंकत असे. तिचा सर्व खजिना रिता झाला. दिलवरला काही सुचेना. ती एखाद्या वेड्याप्रमाणे वागू लागली.

राजपुत्र तिला म्हणाला, ''हे द्यूत खेळणाऱ्या चतुर स्त्रिये! अजून अर्धी रात्र बाकी आहे. तर आता सांग, काय डावावर लावतेस ते?''

राजपुत्राचे हे उद्‌गार ऐकून दिलवरच्या डोळ्यांतून अश्रुधारा वाहू लागल्या. तेव्हा राजपुत्र म्हणाला, ''हे सुंदरी, तू अशी निराश होऊ नकोस. अजून उपाय आहे. तुला द्यूत खेळण्याची संधी मिळू शकते. तुझ्या कैदेत पुष्कळ दूरदूरचे अमीर-उमराव, राजे-शाहजादे कैद आहेत. त्यांना पणाला लाव.'' ती तयार झाली आणि डाव सुरू झाला. हा हा म्हणता तोही डाव राजपुत्राने जिंकला.

दिलवर आता बरीच दुःखी झाली होती. पण तिची जुगाराची जिद्द अजून गेली नव्हती. ती म्हणाली, ''हे नवजवान गृहस्था, आता मी सर्वस्व हरले आहे; पण मी स्वतःला पणाला लावीत आहे. जर मी जिंकले तर सगळी दौलत मी परत घेईन आणि जर हरले तर मी तुझी गुलाम, दासी, सेविका म्हणून जन्मभर तुझ्याजवळ राहीन.'' लगेच डावाला सुरुवात झाली आणि राजपुत्राने तोही डाव जिंकून घेतला.

डाव संपला. दोघेही उठली. दिलवर हात जोडून म्हणाली, ''हे स्वामी, मी आता तुमची दासी झाले आहे. आपल्या सेवेत पुढचे सर्व आयुष्य घालवावे अशी ह्या दासीची इच्छा

आहे. हा महाल, ही धनदौलत आणि मी आपलीच आहे. आता येथेच राहावे.''

ताज-उल-मुल्क म्हणाला, ''मी येथे आनंदाने राहिलो असतो पण एका महत्त्वाच्या कामगिरीसाठी मी बाहेर पडलो आहे. ते काम पूर्ण करून मी जरूर येईन आणि तुझा स्वीकार करीन.'' तेव्हा ती म्हणाली, ''महाराज, काय कार्य आहे आपले ते मला सांगा. मला ते पुरे करण्याकरिता जे करता येणे शक्य आहे ते मी करीन, पण मला एकटीला टाकून जाऊ नका.'' तेव्हा ताज शांतपणे तिला म्हणाला, ''हे माझ्या प्रिये! मी कोण व कोणत्या कामगिरीवर हा परदेश पत्करला ते आता सांगतो. ऐक -

पूर्वेकडील देशांतील शिरकस्तान नावाच्या देशाचा मी राजपुत्र आहे. माझे नाव ताज-उल-मुल्क. मी दुर्दैवी आहे. मला पाहताच माझ्या वडिलांची दृष्टी गेली आणि ते आंधळे झाले. अनेक उपायांनीही त्यांची दृष्टी परत आली नाही. शेवटी एका थोर हकिमाने सांगितले की गुलबकावलीचे फूल मिळाले तर बादशहाची दृष्टी येईल. त्या बकावलीच्या फुलाच्या शोधार्थ माझे चौघे मोठे भाऊ निघाले होते. ते चौघेही तुझ्या कैदेत आहेत आणि मी युक्त्याप्रयुक्त्या करून तुझ्यापर्यंत येऊन पोचलो. हा आहे माझा इतिहास. आता मला पुढे निघालेच पाहिजे. जर ते फूल मिळाले तर मी जरूर येईन.''

यावर दिलवर म्हणाली, ''हे सख्या, हे भयंकर काम आहे. गुलबकावली कोण आणि ते फूल काय ह्याची तुम्हाला काहीच माहिती दिसत नाही. ते फूल प्राप्त करणे अशक्य आहे. तुमचे प्राण मात्र फुकट जातील.

हे प्राणसख्या! बकावली ही पऱ्यांच्या बादशहाची कन्या आहे. इरम हे तिचे नगर. तिच्या बागेत एका उंच झाडावर ते फूल फुललेले आहे. तेथे फार मोठा तट आहे. हजारो यक्ष व राक्षस त्या बागेभोवती सक्त पहारा करीत आहेत. कोणीही परवानगीशिवाय तेथे जाऊन पोहोचू शकत नाही.

ते फूल ज्या वृक्षावर फुललेले आहे, तो वृक्ष एका खोल हौदात आहे. तेथून फूल प्राप्त करणे अशक्य आहे. कदाचित कुणी भुयार खणून ते फूल मिळवू पाहील, म्हणून त्या कामासाठी मूषकराजाची नेमणूक झालेली आहे. तो रात्रंदिवस आपले लाखो उंदीर-सैनिक घेऊन पृथ्वीच्या तळात गस्त घालीत असतो.

"हे प्राणप्रिया, प्राणाचे मूल्य देऊनही ते फूल प्राप्त होऊ शकणार नाही. तरी आपण त्या गुलबकावलीच्या फुलाचा नाद सोडून द्यावा." यावर राजपुत्र म्हणाला, "ते प्राप्त करण्यासाठी प्रयत्न करणे माझे कर्तव्य आहे. त्या फुलाने जर माझ्या वडिलांची दृष्टी परत येणार असेल तर काहीही करून ते फूल मिळविलेच पाहिजे. जर मी त्यात जिंकलो तर मी तुझाच आहे.

हे प्राणप्रिये, आता तू जे कोणी राजकुमार, शाहजादे, अमीर-उमराव कैद करून ठेवले आहेस त्यांना सोडून दे. तुझे कल्याण होईल. ईश्वर आपली भेट पुन्हा लवकरच घडवून आणील."

यावर दिलवर म्हणाली, "तुम्ही जेथे जात आहा तेथे ती गुलबकावली म्हणजे विश्वातली सौंदर्याची खाणच आहे. तिची तुम्हाला मोहिनी पडेल. तरी कोणत्याही मोहाला बळी पडू नका. आपले काम पुरे करा व परत या. ईश्वर तुम्हाला यश

देवो.'' मग तिने राजपुत्राच्या प्रवासाची तयारी केली व त्याला रवाना केले.

❀ ❀ ❀

## भाग ४ गुलबकावलीच्या फुलाचा शोध लागला

राजपुत्र आपल्या प्रियसखी दिलवरचा निरोप घेऊन निघाला. काही दिवस चालल्यानंतर त्याला एक घनघोर अरण्य लागले. त्या भयंकर अरण्याच्या मध्यभागी तो जाऊन पोचला. तो पुढे निघाला तेव्हा लतावेलींमध्ये अडकून पडू लागला. पायात काटे बोचू लागले, भयंकर हिंस्र पशूंशी सामने होऊ लागले; पण तो अल्लाचे नाव घेई. वडिलांचे स्मरण करी. गुलबकावलीचे फूल आठवी व पुढे चाले. अशाप्रकारे संकटांशी सामना करीत तो एकदाचा एका मैदानी प्रदेशात येऊन पोचला. अरण्य संपल्यामुळे त्याला फार फार आनंद झाला.

पण पुढे जे मैदान होते तेही इतके विशाल होते की, पुढचे काहीच दिसेना. कोठे गाव ना घर, झाड ना झुडूप. तो त्या मैदानाकडे जरा निरखून पाहू लागला. तो त्याला लांब लांब एक काळासा मोठा उंच व जाडजूड लोखंडाचा खांब उभा असलेला दिसू लागला. राजपुत्र त्या खांबाकडे जाऊ लागला.

ताज-उल-मुल्क त्या खांबाजवळ पोचला. तो ती वस्तू माणसाच्या आकाराची दिसू लागली. हा राक्षस तर नसेल ना

असे त्याला वाटले आणि मनात भीती वाटली. पण भीती वाटून पळून तरी कोठे जाणार ?

इतक्यात त्या आकृतीची नजर ताजवर पडली आणि ती इतक्या मोठ्याने ओरडली की, गर्जनेच्या पहिल्याच झटक्यात ताज धाडकन् जमिनीवर कोसळला व बेशुद्ध पडला. थोड्या वेळाने शुद्धीवर येऊन पाहतो तो ती आकृती समोर उभी होती. तो एक भयंकर राक्षस होता. भयानक चेहरा, वीतवीत दात, केस मोकळे सोडलेले. ते काळेकुट्ट, अक्राळविक्राळ स्वरूप पाहून राजपुत्र थरथर कापू लागला.

राक्षस आपल्याशीच म्हणाला, ''वाहवा! चांगली मेजवानी घडणार आज. आयता चालून आला माझ्या पंजात!'' नंतर त्या राक्षसाने जरा बारकाईने ताजकडे पाहिले. त्याच्या मनावर काय परिणाम झाला कुणास ठाऊक? पण त्याचे मन बदलले. तो म्हणाला, ''हे सुंदर पुरुषा! अशा ह्या कोवळ्या वयात तुला येथे मृत्यूच्या पंजात कुणी पाठविले? तू येथे का आलास? तू कोण, कुठला ते सगळे सांग. खरेखरे सांग, नाही तर तुझी खैर नाही. तुला उचलून सरळ तोंडात टाकीन आणि गट्ट करीन बघ.''

त्या राक्षसाचा रुद्रावतार पाहून व भयंकर आवाज ऐकून राजपुत्र थरथर कापत होता. त्याचा चेहरा पांढरा फटफटीत पडला होता. पण त्यातही त्या राक्षसाच्या बोलण्यामुळे त्याला जगण्याची थोडी आशा निर्माण झाली. तो घाबरत घाबरत म्हणाला, ''हे राक्षसमहाराज! माझी हकीकत सांगू म्हणतोस, सांगतो ऐक बाबा. जरा शांत चित्ताने जर तू ती ऐकलीस तर मी किती दुर्दैवी आहे आणि कसा व का ह्या मृत्यूच्या जगात आलो आहे, ते तुला कळेल व तुलाच माझी

दया येईल.'' मग राजपुत्राने आपली सगळी हकीकत त्या राक्षसाला कथन केली.

ती हकीकत ऐकून राक्षसाला त्याची दया आली. तो त्याला म्हणाला, ''तू निश्चिंत राहा. माझी भीती सोड. उलट मी तुला मदत करीन.'' मग ते दोघे तेथून निघाले. राक्षस ताजसह आपल्या घरी पोचला. ते दोघे एकत्र राहू लागले. राक्षस ताजशी फारच चांगला वागे. तुझे कार्य सफल होईल व तुला गुलबकावलीचे फूल जरूर मिळेल अशी तो त्याला हिंमत देई.

राजपुत्राने आपल्या बोलण्यात अगदी साखर घोळली. तो दररोज त्या राक्षसाशी अगदी गोड बोलून त्याला खूष करी. त्याला सुंदर सुंदर गोष्टी सांगे. त्याने त्या राक्षसाच्या अंत:करणात चांगलेच स्थान मिळविले.

राजपुत्र फळे खाऊन दिवस काढीत असे. एकदा राक्षस त्याला म्हणाला, ''तू हे असे किती दिवस खाणार ? त्यावर तू कसा जगणार ?'' राजपुत्र म्हणाला, ''महाराज, जे मिळेल त्याच्यावर दिवस काढावे लागतात. आता मला जर माझे माणसाचे जेवण मिळाले तर मी चांगला जेवीन. पण ते येथे येणार कोठून ? गहू, साखर, तूप, मांस, मासळी हे तर येथे दिसतही नाही.''

राजपुत्राचे बोलणे ऐकून राक्षस आकाशमार्गाने उडाला आणि एका उंटांच्या काफिल्याजवळ उतरला. राक्षसाला पाहून काफिल्यातील माणसे पळून गेली. तो व्यापारी काफिला होता. शेकडो उंट गहू, तेल, तूप, साखर ह्यांनी लादून ते लोक दुसरीकडे नेत होते. ते लोक पळून गेल्यावर राक्षसाने त्यांतील पंधरा-वीस उंट उचलले, आपल्या खांद्यावर घेतले आणि आकाशमार्गाने तो घरी आला. नंतर तो

राजपुत्राला म्हणाला, ''बेटा! हे घे धान्य. ह्यात गहू आहेत, तूप आहे, साखर आहे आणि चार बोकडही आणले आहेत. कर बरे आता तुझ्या पद्धतीचे जेवण आणि खा पोटभर.''

राजपुत्राने त्या उंटांवरील सामान काढले. उंटांना जंगलात चरायला सोडून दिले. आता तो रोज आपल्यापुरत्या कच्च्यापक्क्या भाकऱ्या भाजून खाऊ लागला. एक दिवस त्याने स्वादिष्ट अन्न शिजवले. तसेच एक बोकड कापून त्याचे मटण शिजवून ठेवले.

राक्षस बाहेरून आला. त्याने ते अन्न पाहिले. राजपुत्राने ते सर्व अन्न राक्षसाच्या पुढ्यात ठेवले. राक्षसाने बकाबका ते स्वादिष्ट अन्न खायला सुरुवात केली. अशाप्रकारचे मानवी अन्न त्याने कधीच खाल्ले नव्हते. त्याला ते फार आवडले आणि गोडही लागले. तो अधाशासारखा ते खाऊ लागला.

राक्षसाला हे जेवण आवडल्यापासून राजपुत्र दररोज उत्तम उत्तम पदार्थ करू लागला व राक्षसाला खायला घालू लागला. राक्षस त्याच्यावर अधिकाधिक खूष होऊ लागला. एक दिवस राक्षस ताजला म्हणाला, ''तू दररोज नवीन नवीन प्रकारचे अन्न शिजवून मला खायला घालतोस. पण मी मात्र तुझे कोणतेच काम केले नाही. जर तुझे काही काम असेल तर मला सांग. मी ते जरूर करीन.''

राजपुत्र म्हणाला, ''माझे काम तर आहेच. पण ते काम सांगायला मला भीती वाटते.'' राक्षस म्हणाला, ''तू तुझे काम सांग. हजरत सुलेमानाची शपथ घेऊन मी सांगतो की, तुझे काम मी नक्की करीन.''

यावर राजपुत्र म्हणाला, ''ठीक आहे, आपणाला माहीतच आहे की, मी कोणत्या कामगिरीवर बाहेर पडलो

आहे. तर आता मला गुलबकावलीचे फूल प्राप्त होईल असे काहीतरी आपण करावे, ही प्रार्थना आहे.''

राजपुत्राचे भाषण ऐकताच तो राक्षस एकदम क्रोधायमान झाला. त्याचे डोळे लाल झाले. त्याचा तो रुद्रावतार पाहून राजपुत्राला वाटले की, बस! आपले आयुष्य संपले आता - आता हा आपणाला मारणार, खाणार, गट्ट करणार. आणि भीतीनेच तो बेशुद्ध पडला.

थोड्या वेळाने राजपुत्र शुद्धीवर आला. राक्षस लहान रूप घेऊन त्याच्याजवळ बसला होता. राक्षस म्हणाला, ''हे मनुष्यपुत्रा! चांगला डाव साधलास! माझी इच्छा नाही, पण मला तुझे काम आता केलेच पाहिजे.

बकावली ही पऱ्यांच्या बादशहाची कन्या आहे. अठरा हजार यक्ष व किन्नर तिच्या वडिलांच्या गुलामगिरीत आहेत. तेथील रखवालदारांनीही बकावलीच्या वाड्यात काय आहे आणि काय नाही ते पाहिलेले नाही. जेथे यक्ष-किन्नरांनाही रिघाव नाही तेथे तुझा प्रवेश कसा होईल?''

राजपुत्र म्हणाला, ''आपण जे सांगता ते सर्व मला माहीत आहे. मला आपली मदत हवी आहे. आपण वाटेल ते करा व मला बकावलीच्या वाड्यात पोचवून द्या.''

राक्षस म्हणाला, ''बाबारे, हे काम करावे तरी कसे? सक्त पहाऱ्यात पक्षीसुद्धा तेथे पोचू शकत नाही. आता मी करू तरी काय? तुला कसे पोचवू? आणि न पोचविले तर मी घेतलेली शपथ मोडेल व माझे मरण ओढवेल; पण आता तर तुझे काम केलेच पाहिजे. तू आता उत्तमात उत्तम स्वयंपाक करून ठेव. पाहतो प्रयत्न करून.'' असे म्हणून राक्षसाने आकाशात एकदम उडी मारली व थोड्याच वेळात तो दिसेनासा झाला.

इकडे ताज स्वयंपाक करण्यात गुंतला. त्याने पंचपक्वान्ने तयार केली. उत्तम स्वयंपाक तयार करून तो राक्षस परत येण्याची वाट पाहात बसला.

थोड्याच वेळात आकाशात मेघगर्जनेसारखा फार मोठा आवाज झाला आणि दोन राक्षस खाली उतरले. राजपुत्राने त्यांना पाहून त्या दोघांना नमस्कार केला. हे दोघे राक्षस पक्के मित्र होते. पैकी पहिला राक्षस हा धाकटा होता. त्याचे नाव साहेबखाना होते आणि दुसरा राक्षस मोठा असून त्याचे नाव बादशहाखाना होते.

नंतर ते दोघेही राक्षस जेवायला बसले. पंचपक्वान्नांचे ते सुग्रास अन्न खाऊन ते राक्षस खूष झाले आणि आनंदाने नाचू लागले. नाचता नाचता साहेबखाना त्या दुसऱ्या राक्षसाला म्हणाला, "दादा! मी सध्या एका मोठ्या अडचणीत पडलो आहे."

या तरुण मुलाला गुलबकावलीचे फूल हवे आहे. त्याचे वडील बादशहा झैन-उल्क-मुल्क यांच्या डोळ्यांचे तेज जाऊन ते आंधळे झाले आहेत. त्यासाठी त्याला त्या फुलाची जरूर आहे. हे काम फार अवघड आहे. पण तू ह्यात काही मदत करशील तर मात्र जरूर हे काम होईल व माझे प्राण वाचतील.

एकदा मी खूष झालो आणि राजपुत्राला सांगितले की, तू रोज गोड गोड पदार्थ मला खाऊ घालतोस म्हणून मी फार संतुष्ट झालो आहे. तुझे काही काम असेल तर सांग, मी ते करून देईन. त्या खुशीच्या भरात मी हजरत सुलेमानाची शपथ खाल्ली आणि त्याला सांगितले, कसलेही काम असले तरी ते मी जरूर करीन. तेव्हा मला ह्या तरुणाचे काम केलेच पाहिजे."

त्यावर बादशहाखाना म्हणाला, ''तू काही काळजी करू नकोस. हे काम माझ्याकडे लागले. अरे, इरम नगरीत गुलबकावलीच्या वाड्यावर जे अठरा हजार यक्ष-किन्नर व राक्षस पहाऱ्यावर आहेत त्यांची सरदार माझी बहीण हम्माला यक्षिणी असून तिची माझ्यावर खास मर्जी आहे. ती तेवढे काम जरूर करील. तू चिंता सोड.'' लगेच बादशहाखानाने हम्मालाला एक पत्र लिहिले -

प्रिय ताई हम्माला,

तुझा भाई बादशहाखाना याचा सलाम. मी हे पत्र घेऊन एका तरुणाला तुझ्याकडे पाठवीत आहे. तो माणूस आहे. त्याचा तिरस्कार करू नकोस. तो सुंदर आहे. मी त्याला चांगले सांभाळले आहे. त्याला काही दिवस तुझ्या कृपाछत्राखाली ठेवावे. त्याच्या जीविताला धोका होणार नाही याची काळजी घ्यावी. पत्राचे उत्तर द्यावे.

तुझा भाई
बादशहाखाना

बादशहाखानाने ते पत्र राजपुत्राजवळ दिले. लगेच त्याने एक राक्षसदूत तेथेच जादूने निर्माण केला आणि त्याच्या खांद्यावर ताजला बसवून रवाना केले.

राक्षसदूत आकाशमार्गाने ताजला घेऊन उडाला आणि हम्मालाच्या वाड्यात जाऊन पोचला. त्याने राजपुत्राला हम्मालाच्या समोर उभे केले. राजपुत्राने तिला नमस्कार केला व ते पत्र तिच्या हातात दिले.

राजपुत्राचे स्वरूप पाहून हम्माला फारच खूष झाली. ती मनात म्हणाली, किती सुंदर नि किती उत्तम. मग तिने ते पत्र वाचले. तिने ताबडतोब पत्राचे उत्तर लिहिले.

भाई बादशहाखाना,

सलाम !

तू पाठविलेली वस्तू पोचली. पत्रही मिळाले. तुझ्याकडून आलेल्या वस्तूची चांगली काळजी घेतली जाईल. तू पाठविलेला मानवपुत्र इतका तरुण व सुंदर आहे की, मला तो फारच आवडला. त्याला पाहताच माझी कन्या शाहजादी हिचे त्याच्याबरोबर लग्न लावून द्यावे असे मी ठरविले आहे. असो, विशेष वर्तमान पुढे कळवीनच.

तुझी ताई

हम्माला

हे पत्र घेऊन तो राक्षसदूत बादशहाखानाकडे रवाना झाला. इकडे थोडे दिवस गेले तोच शाहजादीचे ताज-उल-मुल्कबरोबर मोठ्या थाटाने लग्न लागले आणि राजपुत्र तेथे अत्यंत आनंदाने व निर्भयपणे राहू लागला.





भाग ५

## राजपुत्राने गुलबकावलीचे फुल मिळविले



लग्न झाल्यावर राजपुत्र बरेच दिवस शाहजादी महमुदाच्या प्रेमपाशात सुख भोगीत होता. पण त्याचे मन कर्तव्याच्या चिंतेने जळत होते. गुलबकावलीच्या फुलाचा ध्यास करीत होते.

एके दिवशी शाहजादी महमुदा म्हणाली, ''हे प्राणप्रिया, हे असे काय चालविले आहे तुम्ही ? तुम्ही खूष का नाही ?''

यावर राजपुत्र म्हणाला, ''मी एका फार मोठ्या महत्त्वाच्या मोहिमेवर निघालो आहे आणि अजून माझे कार्य अपूर्ण आहे.''

महमुदा म्हणाली, ''हे प्राणवल्लभा! अशी कोणती मोहीम आहे ती?'' त्यावर राजपुत्र म्हणाला, ''हे प्रिय सखी! मला गुलबकावलीचा बगिचा पाहावयाचा आहे. तर तू तुझ्या आईला सांग व तेवढी व्यवस्था कर.''

महमुदा म्हणाली, ''ठीक आहे.'' ती सरळ हम्मालाकडे आली आणि तिला म्हणाली, ''आई! तुझे जावई की नाही गुलबकावलीचा बगिचा पाहू इच्छितात. त्यांना फार ओढ लागली आहे त्या बागेची.''

हम्माला म्हणाली, ''नको ग बाई तो बगिचा पाहणे. सोपी गोष्ट आहे का ती? जर का कुणाला सुगावा लागला तर माझा निकालच लागेल.''

पण महमुदा काही आपला आग्रह सोडायला तयार नव्हती. ती हट्ट घेऊनच बसली आणि शेवटी हम्मालाचा निरुपाय होऊन ती त्या गोष्टीला तयार झाली.

तिने मूषकराजास बोलाविले आणि राजपुत्राला तुम्ही स्वत: पाठीवर बसवून त्या भुयारीमार्गाने गुलबकावलीच्या बागेत नेऊन सोडा व बाग दाखवून परत आणा अशी आज्ञा केली. लगेच मूषकराजाने राजपुत्राला पाठीवर घेतले आणि तो सरळ बकावलीच्या बगिचात जाऊन पोचला.

राजपुत्राला वाटले की, आपण आता जरा मोकळे होऊन गुलबकावलीच्या फुलाचा शोध घ्यावा; पण मूषकराज त्याला सोडायला तयार नव्हता. त्याला हम्मालाची तशी आज्ञा होती. त्याने राजपुत्राला सांगितले की, मी तुला मुळीच मोकळे सोडणार नाही.

त्यावर ताज थोडेसे रागावल्यासारखे करून म्हणाला, ''मूषकराज! मला सोड नाहीतर तुझी मान पकडून तुला ठार करून टाकीन.'' संकट ओळखून मूषकराजाने राजपुत्राला जाऊ दिले.

ती वेळ अशी होती की, त्यावेळी त्या बागेत कुणीही नव्हते. ताज त्या बागेत फिरू लागला. ती बाग म्हणजे जणू प्रत्यक्ष स्वर्गीय देवांचा बगिचा होता. जणू नंदनवनच ते. त्या बागेचे सौंदर्य पाहून तो थक्क झाला. तेथील जमीन सोन्याची होती. चारी बाजूंना ज्या भिंती बांधल्या होत्या त्या भिंतींना हिरे, माणके, लाल, मोत्ये, पोवळी जडलेली होती. बगिचात जिकडेतिकडे कारंजी उडत होती. जिकडेतिकडे गुलाबाचे ताटवे फुलले होते.

त्री बाग पाहता पाहता तो पुढे गेला. पुढे त्याला एक हौद दिसला. त्याच्या भिंतींवर सुवर्णाचे कलश जडलेले होते. त्या हौदातील पाणीही सुगंधित होते.

अशा त्या हौदाच्या मध्यभागी एक विशाल वृक्ष होता. त्यावर एकच फूल फुलले होते. ते फूल अत्यंत सुंदर होते, नाजूक होते, सुगंधित हाते आणि अत्यंत तेजस्वी होते. राजपुत्राची नजर त्यावर गेली व त्याच्या चेहऱ्यावर खुशीची छटा उमटली. हेच गुलबकावलीचे फूल होय हे त्याने ओळखले. क्षणाचाही विलंब न करता त्याने आपले कपडे उतरविले आणि हौदात उडी टाकली. तो पोहत पोहत त्या वृक्षाजवळ गेला. वृक्षावर चढून त्याने ते फूल तोडले व लगेच हौदाच्या काठावर आला. त्याने कपडे चढविले. ते फूल आपल्या रेशमी उपरण्यात गुंडाळून कमरेला बांधले आणि तेथून निघण्याचा तो विचार करू लागला.

पण हौदाच्या जरा पुढे त्याला एक महाल दिसला. तो हिंमत करून त्या महालात शिरला. त्या महालातील सर्व जागा रत्नांनी भरली होती. तो एकेक दालन पाहून अत्यंत खूष होत होता. अशाप्रकारे तो महालाच्या मधल्या दालनात येऊन दाखल झाला. तो आरसेमहाल होता. रत्नांनी खचून जडविलेला होता. हे सगळे पाहात असता त्याची नजर एका पलंगावर गेली. तो पलंग सोन्याचा होता. त्यावर रत्ने मढली होती आणि त्यावर एक अत्यंत सुंदर व तरुण युवती झोपली होती. तिच्याकडे पाहून तो आश्चर्यचकित झाला. तो थोडावेळ नुसता पाहातच राहिला. तिच्या त्या अप्रतिम सौंदर्यावर तो मोहून गेला.

तीच बकावली होती आणि तो महाल व बगिचा तिचा होता. गुलबकावली शांत झोपली होती. राजपुत्राने तिच्या बोटातील अंगठी हळूच काढली व ती आपल्या बोटात घातली. आपली अंगठी काढून ती त्याने गुलबकावलीच्या बोटात घातली आणि तो तेथून निघाला. अखेरीस भुयाराच्या तोंडाशी येऊन तो मूषकराजाच्या पाठीवर बसला आणि रवाना झाला.

तो घरी आला तेव्हा हम्माला चिंताक्रांत होऊन त्याची वाट पाहात होती. त्याला पाहून तिने समाधानाचा सुस्कारा सोडला. तोच त्याची प्रिया महमुदा धावतच येऊन त्याच्या गळ्यात पडली आणि त्याला रंगमहालात घेऊन गेली.





भाग

६



# राजपुत्र दोन राण्यांसह देशाला परत



एके दिवशी राजपुत्र व महमुदा आपल्या रंगमहालात बसली होती. इकडच्या तिकडच्या बऱ्याच गोष्टी झाल्या. राजपुत्र मनाशी विचार करू लागला की, आणखी किती दिवस येथे राहावे बरे! गुलबकावलीचे फूल प्राप्त झाले आहे. आता कधी घरी जाईन व मातापित्यांना भेटेन असे जिवाला झाले आहे. आता येथून जाण्याचा काही उपाय शोधून काढला पाहिजे.

असा विचार त्याच्या मनात येऊन तो जरा खिन्न होऊन बसला. त्याची ही अवस्था पाहून महमुदा म्हणाली, ''हे प्राणनाथ! आपण असे दु:खी का? आपल्या मनात काय विचारचक्र चालू आहे ते मला सांगा. ते जर मला कळले तर बरे होईल.''

त्यावर राजपुत्र म्हणाला, ''हे सखे, प्राणवल्लभे! तू बरोबर ओळखलेस. मला येथे अनंत सुखे आहेत. तुझ्यासारख्या पत्नीच्या सहवासात मला स्वर्गाचे सुखही तुच्छ वाटते; पण हे जरी खरे असले तरी मी येथे असा किती दिवस नि किती वर्षे राहणार? मला माझ्या आईवडिलांची आठवण येते. तेव्हा आपण येथून माझ्या देशाला जाऊया.''

त्यावर महमुदा म्हणाली, ''जर आपली इच्छा येथून चलावे अशी असेल, तर मी उद्याच आईची परवानगी घेते.''

दुसऱ्या दिवशी ती आईच्या महालात गेली. प्रणाम करून म्हणाली, ''आई, माझे पतिराज नेहमी खिन्न असतात.

त्यांचे म्हणणे आहे की, मला माझ्या आईवडिलांची खूप आठवण येते. मला आता माझ्या राज्यात गेले पाहिजे आणि तूही बरोबर आली पाहिजेस. त्याचीच परवानगी मागायला मी आल्ये आहे.''

हम्मालाने आपल्या मुलीला तिच्या पतीबरोबर त्याच्या राज्यात जाण्याची परवानगी दिली. मुलीचा वियोग होणार होता म्हणून तिला दु:ख होत होते. पण मुलगी सासरी जात आहे म्हणून आनंदही वाटत होता.

ती दोघे जाण्याच्या तयारीने हम्मालासमोर येऊन उभी राहिली. हम्मालाने आपल्या डोक्यातील दोन केस उपटून त्या दोघांजवळ दिले आणि म्हणाली, ''तुम्हाला माझी जरूर भासली, तर अग्नी पेटवा व त्यावर हा केस टाका. मी लगेच तेथे हजर होईन.'' त्या दोघांनीही तिच्या पायावर डोके ठेवले व तिला साष्टांग नमस्कार घातला.

नंतर हम्मालाने मंत्रसामर्थ्याने एक भयंकर अक्राळविक्राळ राक्षस तयार केला व त्याला आज्ञा केली की, 'हे पहेलवान, ह्या दोघांना त्यांच्या इच्छित स्थळी पोचव. आणि पोचल्याची खबर द्यायला पुन्हा परत ये.'

त्या राक्षसाने राजपुत्राला आणि महमुदाला खांद्यावर घेतले, त्यांचे सर्व सामान कमरेला बांधले आणि आकाशात उड्डाण केले. नंतर राजपुत्राच्या आज्ञेप्रमाणे तो राक्षस फिरदोश शहरात दिलवरच्या वाड्यात उतरला. त्यांना तेथे सोडून त्यांची चिठ्ठी घेऊन तो पुन्हा आकाशमार्गाने हम्मालाकडे परत गेला.

वाड्यात कुणीतरी आले असल्याची बातमी दिलवरला मिळाली. कोण आहे ते पाहण्यासाठी ती महालाच्या दारात आली तो तिला समोर ताज-उल-मुल्क दिसला. ती देहभान

विसरली व धावत जाऊन त्याच्या गळ्यात पडली. तिने त्याला मिठी मारली आणि तिच्या डोळ्यांतून आनंदाश्रू वाहू लागले.

दिलवरने त्या दोघांना महालात नेले. खाणेपिणे झाले. मग राजपुत्राने आपले शाहजादी महमुदाबरोबर लग्न कसे झाले, गुलबकावलीच्या बागेत प्रवेश कसा मिळाला व गुलबकावलीचे फूल कसे प्राप्त झाले ही सगळी हकीकत दिलवरला निवेदन केली.

ही हकीकत ऐकून दिलवर महमुदाला भेटली. तिने तिला आलिंगन दिले आणि तिचे आभार मानले. दिलवर तिला म्हणाली, ''तू माझ्या प्राणवल्लभाला जी मदत केलीस, ती फार मोलाची आहे. आता आपण सवती असलो तरी सख्ख्या बहिणींप्रमाणे राहू.''

काही दिवस तेथे राहिल्यानंतर राजपुत्राने वडिलांना लवकरच दृष्टिलाभ करून दिला पाहिजे ही इच्छा दिलवरला सांगितली. लगेच तिने राजपुत्राची त्याच्या राज्यात जाण्याची तयारी केली.

इतक्यात तिच्या बंदीखान्यावरचा दरोगा आला नि म्हणाला, ''बाईसाहेब! आपण आता येथून जाणार म्हणता. आपल्या कैदखान्यातील पूर्वेचे चार राजपुत्र मात्र अजून आहेत. आतापर्यंत मी त्यांची उत्तम व्यवस्था ठेवली होती. यापुढे त्यांचे काय करावे याची आज्ञा व्हावी.''

त्यावर दिलवर राजपुत्राकडे पाहू लागली आणि म्हणाली, ''ते चार राजपुत्र आपले बंधू आहेत. आता आपली आज्ञा होईल त्याप्रमाणे करते. सांगा काय करू ते?''

राजपुत्र म्हणाला, ''ते जरी माझे भाऊ असले तरी ते तुझे गुलाम आहेत. कर्तव्य विसरणारे आहेत. त्यांच्या पाठीवर

तुझ्या गुलामगिरीच्या शिक्क्याचे डाग देऊन त्यांना मोकळे कर आणि हवे तिकडे जायला त्यांना परवानगी दे.''

लगेच दिलवरने दरोग्याकरवी त्या चारी राजपुत्रांच्या पाठीवर गुलामगिरीच्या शिक्क्याचे डाग दिले आणि त्यांना सोडून दिले. राजपुत्राने त्यांना एकेक लाख रुपये वाटखर्चाला देऊन वाटेला लावले.

काही असो, आपले प्राण तर वाचले असा निर्लज्ज विचार करून ते राजपुत्र आपल्या राज्याकडे परत निघाले. इकडे राजपुत्राने सगळा भारी माल जहाजात भरला आणि दिलवर व शाहजादी महमुदा ह्यांना जहाजात बसवून समुद्रमार्गाने आपल्या देशाला रवाना केले. त्याने त्यांना सांगितले की, लवकरच मीही भूमार्गाने आपल्या राजधानीला पोचतो. तिघांनी एकमेकांचे निरोप घेतले व आपल्या मार्गाने पुढे जाण्यासाठी ती रवाना झाली.

❀ ❀ ❀

## भाग ७ — भावांनी गुलबकावलीचे फूल पळविले

दिलवरच्या महालातून राजपुत्र निघाला. त्याने फकिराचा वेष घेतला आणि रस्त्याच्या एका कडेला अल्ला, खुदा! अल्ला, खुदा! असे परमेश्वराचे नाव जपत बसला.

इतक्यात त्याचे चार भाऊ त्याच रस्त्याने जात असलेले त्याने पाहिले. त्यांना त्याने ओळखले. ते जवळ येताच हा फकीर म्हणाला, ''हे गड्यांनो, तुम्ही कुठे निघालात?''

यावर त्या चौघांपैकी एकजण म्हणाला, ''आम्ही प्रवासी आहोत. आपल्या देशाला निघालो आहोत.'' फकीर म्हणाला, ''मी येऊ का आपल्याबरोबर? मी एक फकीर आहे. मीही सफरीला निघालो आहे.''

चल ना बाबा! आमची काही हरकत नाही असे राजपुत्रांनी फकिराला सांगितले व तोही त्यांच्याबरोबर निघाला.

मजल-दरमजल करीत ते एका शहराजवळ येऊन पोहोचले. रात्री त्यांनी त्या शहराच्या बाहेर एका धर्मशाळेत मुक्काम केला. खाणेपिणे आटोपून ताज झोपला; पण त्याला झोप लागली नव्हती. चौघे भाऊ काय गोष्टी करतात ते ऐकण्यासाठी त्याचे कान टवकारलेले होते.

रात्री ते चौघेजण खाणेपिणे आटोपून गप्पागोष्टी करीत बसले; तो एकजण म्हणाला, ''गुलबकावलीचे फूल तर नाहीच, पण गुलामगिरीचे शिक्के मात्र आपण घेऊन जात आहोत. आता वडिलांना काय सांगायचे?''

त्यावर दुसरा म्हणाला, ''काय सांगायचे म्हणजे? सांगू, आम्ही सगळी पृथ्वी धुंडाळली, पण ते फूल कुठेच मिळत नाही. ते या पृथ्वीवर नाहीच मुळी.''

तिसरा म्हणाला, ''बादशहा फार म्हातारा झाला आहे. आतापर्यंत त्याने स्वर्गसुद्धा गाठला असेल. काय उपयोग ते फूल मिळवूनही.''

चौथा म्हणाला, ''आणि नाही मिळविले म्हणून काय झाले? उलट मिळविले नाही हेच योग्य झाले. बादशहा आंधळा झाल्यामुळे आपणाला राज्य मिळेल. आपण राजे होऊ.''

ताज त्या चौघांचे हे भाषण ऐकत होता. त्यांचा वडिलांबद्दलचा अनादर पाहून व त्यांच्या लबाड्या ऐकून

त्याला त्यांचा राग आला. तो ताडकन उठला आणि त्यांना म्हणाला, ''कृतघ्न, दुष्ट कार्ट्यांनो, स्वत:च्या वडिलांच्या बाबतीत असे बोलताना तुम्हाला लाज नाही वाटत? म्हणे गुलबकावलीचे फूल पृथ्वीवर नाहीच. हे पहा ते फूल मी गुलबकावलीच्या बगिचातून आणले आहे.'' आणि ताजने शेल्यात बांधलेले फूल त्या चौघांना दाखविले.

ते फूल पाहून चौघे राजपुत्र चकित झाले. दुसरा राजपुत्र म्हणाला, ''हे जर गुलबकावलीचे फूल असेल तर त्याची आपण परीक्षा पाहूया. मग म्हणू खरेच आहे ते गुलबकावलीचे फूल. तोपर्यंत आम्ही कसा विश्वास ठेवावा तुमच्यावर!''

तिसरा म्हणाला, ''आपण एखाद्या आंधळ्यावर त्या फुलाचा प्रयोग करूया. मग कळेलच खरे काय नि खोटे काय!''

तो फकीर त्या गोष्टीला तयार झाला. इतक्यात त्यांना एक आंधळा दिसला. तो काठी टेकीत टेकीत भीक मागायला शहरात जात होता.

त्यांनी त्याला थांबविले व त्याच्या डोळ्याला ते गुलबकावलीचे फूल लावले. आश्चर्य असे की, त्याला ताबडतोब दिसू लागले.

हेच गुलबकावलीचे फूल आहे, ह्याबद्दल आता त्या चौघा राजपुत्रांची खात्री पटली. आता ते हरप्रयत्नाने प्राप्त करून घेतले पाहिजे असे त्यांनी ठरविले. चालता चालता ते एका अरण्यात आले आणि तेथे त्यांनी ताज-उल-मुल्कवर एकदम हल्ला चढविला. त्याला चांगले पिटून काढले. त्याच्याजवळून ते फूल काढून घेतले आणि त्याला एका झाडाशी बांधून ठेवून ते पुढे निघाले.

एके दिवशी ते चारी राजपुत्र आपल्या राजधानीजवळ येऊन पोचले. त्यानी बादशहाला कळविले की आम्ही चौघेही पुत्र गुलबकावलीचे फूल प्राप्त करून घेऊन आलो आहोत.

ही खबर बादशहाला मिळताच बादशहा फार खूष झाला. तो आंधळा असूनही स्वत: त्यांच्या स्वागतासाठी लवाजम्यासह निघाला. राजपुत्र भेटताच बादशहाने प्रत्येक मुलाला प्रथम आलिंगन दिले.

लगेच गुलबकावलीचे फूल बादशहाच्या नेत्रांना लावण्यात आले आणि ते लावताच बादशहाला पुन्हा दृष्टी प्राप्त झाली. त्याला फार आनंद झाला. प्रथम त्याने अल्लाचे आभार मानले व प्रार्थना केली. बादशहाला दृष्टी प्राप्त झाली हे पाहून त्या सर्व लोकांना आनंद झाला. जो तो राजपुत्रांना दुवा देत होता आणि म्हणत होता, वाहँवा, पुत्र असावे तर असे! सर्वत्र आनंदी आनंद झाला.

❀ ❀ ❀

भाग ८



## गुलबकावली राजपुत्रावर मोहित झाली

इकडे गुलबकावलीचे काय झाले ते आता आपण पाहू. सकाळ झाल्यावर ती जागी झाली आणि हौदाकडे निघाली.

ती हौदाजवळ पोहोचली. हौदाच्या पाण्याने तिने हातपाय, तोंड धुतले. गुलाबाची फुले तोडली व आपल्या वेणीत खोचली. ती फार आनंदी होती. अशावेळी तिची नजर तिच्या आवडत्या फुलाकडे गेली. तेथे ते फूल नव्हते. तिच्या हृदयात

धस्स झाले. ती इकडेतिकडे पाहू लागली. तिचा चेहरा चिंतातुर दिसू लागला.

तिने ताबडतोब आपल्या दासींना हाक मारली. दासी धावून आल्या. लगेच तिने हौदातील फूल कोठे आहे म्हणून त्यांना विचारले. ते ऐकून सर्व दासी चिंतेत पडल्या. त्यांनी सर्व बागेत शोधाशोध केली. पण फूल कुठे सापडेना व कोणी बागेत आल्याचे चिन्हही दिसेना.

गुलबकावली फार दुःखी झाली. तिचे ते अत्यंत आवडते फूल होते. ती त्याला प्राणापलीकडे जपत होती. नंतर ती म्हणाली, ''इतक्या पऱ्या, यक्ष-किन्नर आणि मूषकराज पहाऱ्यावर असून ते फूल गेले कसे? एवढ्या बंदोबस्तातून ते नेणारा आहे तरी कोण?'' तिने परमेश्वराला हात जोडले. आणि तिची नजर बोटातील अंगठीकडे गेली.

ती अधिकच दचकली. तिला वाटले, कुणी जादू तर केली नाही ना? तिने डोळे चोळले नि पुन्हा पाहिले. अंगठी खरोखरच दुसरी होती.

ती मनाशी विचार करू लागली. 'बरे, फूल नेले तर नेले आणखी ही अंगठीची अदलाबदल केली. हा असेल तरी कोण? केवढी हिंमत त्याची ही! तो किती हुशार असला पाहिजे! किती शूर असला पाहिजे!' ती त्या विचारांत गुंग झाली. नंतर तिने त्या अंगठीकडे जरा निरखून पाहिले. ती एका तरुणाची होती. त्याचेच चित्र त्या अंगठीवर कोरले होते. तो तरुण अत्यंत रूपवान होता. तिच्या मनात त्या पुरुषाबद्दल प्रेम निर्माण झाले. ती म्हणाली, ''याने माझे फूलही चोरले आणि मनही चोरले.''

तिने सर्व पऱ्यांना आदेश दिला की, गुलबकावलीचे फूल चोरणाऱ्या चोराला फुलासह पकडून माझ्यापुढे हजर करा.

ताबडतोब सातशे पऱ्या आकाशात उडाल्या आणि दहाही दिशांना गुलबकावलीचे फूल चोरणाऱ्या चोराचा शोध करू लागल्या. त्यांनी शोध शोध शोधले, सारे जग धुंडाळले, पण ना फूल मिळाले ना चोर सापडला.

बकावलीचे हृदय इश्काच्या बाणाने भेदून गेले. तिचे खाण्यापिण्याकडे लक्ष लागेना. अखेरीस आपणच फुलाच्या आणि फूल चोरून नेणाऱ्या चोराच्या शोधार्थ बाहेर पडावे असा विचार करून तिने हिंमत केली. पडदा टाकून देऊन एके दिवशी तिने महाल सोडला.

आकाशमार्गाने उड्डाण करून बकावली निघाली. ती मोठमोठ्या शहरांत उतरे आणि शहर धुंडाळून काढी. तिच्या अंगी असलेल्या शक्तीमुळे ती गुप्तपणे वावरू शकत होती.

अशा प्रकारे हिंडता फिरता ती पूर्वेकडील शिरकस्तान नगरीत येऊन पोहोचली. तेथे आनंदाच्या नौबती झडत होत्या. शहरात जिकडेतिकडे कमानी उभारल्या होत्या. हा काय प्रकार आहे त्याची चौकशी करावी असे तिला वाटले.

लगेच तिने आपला स्त्रीचा पोशाख उतरून पुरुषाचा पोशाख चढविला व चौकशी केली की, आज ह्या शहरात आहे तरी काय? तेव्हा तिला कळले की, ह्या नगराचा बादशहा झैन-उल-मुल्क हा आंधळा होता. चार दिवसांपूर्वीच त्याच्या चार पुत्रांनी फार मोठा पराक्रम करून गुलबकावलीचे फूल आणले. त्या फुलाच्या स्पर्शाबरोबर बादशहाला दृष्टी प्राप्त झाली. त्या खुशीच्या आनंदात आणि त्या राजपुत्रांच्या स्वागतात आज हे शहर बुडून गेले आहे.

ही हकीकत ऐकून आपला प्राणसखा येथेच सापडेल असा विचार मनात आणून गुलबकावलीने बादशहाला भेटावयाचे ठरविले. ती राजवाड्याच्या दाराजवळ गेली आणि तिने 'मी

बादशहा सलामतना भेटायला दूर देशाहून आलो आहे' असा निरोप पहारेकऱ्याबरोबर पाठविला. तेव्हा बादशहाने तिला आत येण्याची परवानगी दिली.

गुलबकावली दरबारात गेली व बादशहापुढे जाऊन उभी राहिली. बादशहाने तिच्याकडे पाहिले. तिच्या सौंदर्याने बादशहाला आश्चर्यचकित केले. इतका तेज:पुंज तरुण बादशहाने यापूर्वी कधीच पाहिला नव्हता. मग बादशहा म्हणाला, ''हे नवजवान! तू कोठला? कोण? आणि तुझा येथे येण्याचा हेतू काय?''

तो तरुण म्हणाला, ''महाराज! ह्या सेवकाचे वसतिस्थान पश्चिमदेशी आहे. माझे नाव फरुख आहे आणि नोकरीच्या शोधार्थ मी आलो आहे. आपणास नम्र प्रार्थना आहे की, ह्या सेवकाला आपल्या सेवेत स्थान मिळावे. मी इमाने इतबारे सेवा बजावीन.'' बादशहाने त्याला आपल्या पदरी ठेवून घेतले.

आज बादशहाने फार मोठा दरबार भरविला होता आणि त्या दरबारात चारही राजपुत्रांचे जाहीर स्वागत व सन्मान होणार होता. दरबार खच्चून भरला होता.

थोड्याच वेळात बादशहाचे चारही पुत्र दरबारात आले. बादशहाने एकेकाला जवळ घेतले. प्रत्येकाला आलिंगन दिले, त्यांच्या डोक्यावरून हात फिरविला आणि त्यांना जवळच बसविले.

गुलबकावली त्या चौघांकडे बारकाईने पाहात होती. आपल्या अंगठीतील चित्राशी ती प्रत्येकाचा चेहरा ताडून पाहात होती. पण एकाचेही त्या चित्राशी साम्य दिसेना. तेव्हा ती निराश झाली.

जवळपास बसलेल्या लोकांत तिने चौकशी सुरू केली की, बादशहाला कुणी पाचवा पुत्र आहे काय? बादशहाला पाचवा पुत्र नाही असे तिला कळले. हे ऐकून ती फारच निराश झाली.

दरबार संपला व सर्वांच्या बरोबर तीही बाहेर पडली. तिने विचार केला, ज्या अर्थी माझे फूल येथे आले आहे त्या अर्थी ते आणणाराही येथे आला असला पाहिजे. ज्या नादान राजपुत्रांचा सत्कार झाला, ते हे फूल आणणारे नाहीत हे निश्चितच. हे धाडस त्यांच्यात दिसत नाही. जरूर ह्यात काहीतरी गुपित असले पाहिजे, असा विचार करून गुलबकावलीने काही दिवस तेथेच शोध घेत राहण्याचे ठरविले.

❀ ❀ ❀

## भाग ९

## हम्मालाने नवी नगरी उभारली

इकडे चार राजपुत्रांनी ताज-उल-मुल्कला मारझोड करून एका झाडाशी बांधून ठेवले होते व त्याच्याजवळून गुलबकावलीचे फूल घेऊन ते शिरकस्तानला रवाना झाले होते.

ते जरी अरण्य होते तरी त्या अरण्यातून एखाददुसरा प्रवासी जात येत असे. दुसऱ्या दिवशी त्या रस्त्याने असाच एक प्रवासी जात असताना त्याला झाडाशी बांधलेला राजपुत्र दिसला. त्या प्रवाशाने त्याला सोडवले आणि तो निघून गेला.

राजपुत्र तेथून जो निघाला, तो आपल्या राजधानीच्या जवळपास येऊन पोहोचला.

राजधानीपासून दहा कोसावर एक अरण्य होते. त्या अरण्यात त्याने मुक्काम ठोकला. आजूबाजूच्या काटक्या गोळा करून त्याने जाळ केला आणि त्या जाळावर आपल्याजवळ असलेला हम्माला यक्षिणीचा केस टाकला. तो केस जळला मात्र, हम्माला आपल्या अठरा हजार दूतांसह तेथे प्रकट झाली.

राजपुत्राचा फकिरी वेष पाहून तिला वाईट वाटले. ती म्हणाली, ''बोल! तू माझी आठवण का काढलीस?''

ताज म्हणाला, ''येथून दहा कोसावर माझ्या वडिलांची राजधानी आहे. आता येथे ह्या जंगलात एक फार मोठा सुंदर, अगदी गुलबकावलीच्या महालासारखा महाल ताबडतोब बांधून द्या आणि अगदी तसाच एक सुंदर बगिचाही. माझ्याकडून हे होणे शक्य नाही म्हणून मी तुम्हाला त्रास दिला आहे.''

लगेच हम्मालाने तिचे सेवक यक्ष-किन्नर दाही दिशांना रवाना केले आणि दगड-विटा, लाकूडफाटा, संगमरवर, हिरेमाणके, सोनेरुपे आणायला त्यांना हुकूम केला. पाहता पाहता सर्व साहित्य येऊन पडले आणि तीन दिवसांत तेथे बादशहाच्या राजवाड्यापेक्षा भव्य व सुंदर महाल तयार झाला.

त्या महालाच्या समोर एक सुंदर बाग तयार केली गेली. सर्व बगिचा वृक्षलतांनी व फळाफुलांनी फुलवून टाकला होता. बागेच्या मध्यभागी एक हौद बांधला होता. त्यात कारंजी उडत होती. महाल व बगिचा तयार झाल्यानंतर

हम्माला आपल्या अठरा हजार सेवकांसह तेथून आकाशमार्गाने गुप्तपणे रवाना झाली.

महाल तयार झाल्यावर राजपुत्र महमुदा आणि दिलवरच्या शोधास लागला. त्याने सुचविलेल्या ठिकाणीच त्या दोघी राहात होत्या. राजपुत्र तेथे गेला व त्यांना भेटला. तेव्हा त्या दोघींना फार फार आनंद झाला. तो त्यांना मेण्यात बसवून आपल्या नव्या महालात घेऊन आला. तेथे तो ऐषआरामात आणि सुखात राहू लागला.

❋ ❋ ❋

भाग १०

## बादशहा झैनची घाबरगुंडी

हम्माला ज्यावेळी गेली त्यावेळी तिने आपल्या सेवकांपैकी बऱ्याच सेवकांना माणसांची रूपे देऊन राजपुत्राच्या सेवेसाठी मागे ठेवले. तेथे राहून राजपुत्र गोरगरिबांना मदत करू लागला. त्यांच्या गरजा भागवू लागला. ही बातमी शिरकस्तानच्या अनेक गोरगरीब लोकांत पसरली. हजारो गरीब लोक राजपुत्राच्या महालासमोर आले आणि कायम वस्तीच्या तयारीला लागले. हा हा म्हणता तेथे एक गाव वसले व दिवसेंदिवस ते वाढू लागले. तेथे नवीन येणाऱ्या लोकांना राजपुत्र वाटेल ती मदत करू लागला. त्यांना सर्व सोयी करून देऊ लागला. त्यामुळे पुढे लवकरच त्या गावाचे शहर झाले. तेही भराभर वाढू लागले आणि त्या शहराचे नाव निगारीन असे ठेवण्यात आले.

ह्याचा परिणाम असा झाला की, शिरकस्तानची प्रजा भराभर ह्या नवीन नगरीत राहायला येऊ लागली व शिरकस्तान ओस पडू लागले. ही खबर झैन-उल-मुल्कच्या कानावर गेली आणि तो प्रधानाला म्हणाला, ''प्रधानजी, हे काय चालले आहे? शहर खाली का होत आहे? लोक जातात तरी कोठे? काय प्रकार आहे हा?''

त्यावर प्रधान म्हणाला, ''सरकार, हा काय प्रकार आहे ह्याची मलाही खबरबात नाही. पण मी ऐकले आहे की येथून दहा कोसावर त्या भयंकर अरण्यात कुणीतरी सोन्याची जमीन बनवून तिच्यावर एक आलिशान महाल बांधला आहे आणि एक उत्कृष्ट बाग तयार केली आहे. पृथ्वीतलावर तशी बाग कोठेही पाहायला मिळणार नाही. नवीन शहर आबाद होत आहे. जो तेथे राहायला जाईल त्याला तेथील बादशहा हजारो रुपये देतो. राहायला जागा देतो, घर देतो, सगळ्या सोयी देतो म्हणून आपल्या राजधानीतील लोक उठतात आणि तिकडे राहायला जातात. तेथील बादशहा म्हणे सौंदर्यात मदनाचा पुतळा आहे.''

हे ऐकून बादशहाला चांगलीच काळजी लागली की, अशाने तर आपली राजधानी ओस पडेल. मग त्याने प्रधानाला हुकूम केला की, 'प्रधानजी, हा काय प्रकार आहे त्याची चौकशी करा.'

लगेच प्रधान कोतवालाला म्हणाला, ''कोतवाल, तुम्हाला काय माहिती आहे यातली!'' कोतवाल म्हणाला, ''महाराज, आपण जे काही म्हणालात, तेच मी ऐकले आहे. अहो, ते शहर वसू लागल्यापासून आपल्या नगरातील भिकारी, गरीब, दुबळे सगळे नाहीसे झाले आणि तेथे जाऊन

मालामाल झाले आहेत. मला वाटते, आपण स्वत: त्या शहरात जाऊन चौकशी केली पाहिजे.''

❋ ❋ ❋

## भाग ११

## पितापुत्राची ओळख पटली

प्रधानाच्या हुकुमावरून कोतवाल ती नवी वसलेली निगारीन नगरी पाहायला निघाला. घोड्यावर स्वार होऊन तो अरण्याच्या दिशेने जाऊ लागला. सात-आठ कोस चालून गेल्यावर त्याला लांब एक शहर दिसू लागले. तेथील भूमी सुवर्णाची दिसत होती. तेथील उंच उंच हवेल्या त्याला दिसू लागल्या. ही प्रचंड नगरी पाहून कोतवालाला नवल वाटले. तो त्या नगरीत पोहोचला आणि राजवाड्यासमोर जाऊन उभा राहिला. राजपुत्राचा तो राजमहाल पाहून तर कोतवालाने तोंडात बोटेच घातली.

झैन-उल-मुल्क बादशहाचा कोतवाल भेटायला आला आहे, ही बातमी राजपुत्राला कळली. तेव्हा त्याने त्याला आदराने बोलावून चांगल्या आसनावर बसविले. कोतवाल म्हणाला, ''महाराज, आपण येथे ही नवी नगरी वसविली, हे कळल्यावरून बादशहा झैन-उल-मुल्क ह्यांनी चौकशीसाठी मला पाठविले आहे. आपल्या मनात संघर्षाची इच्छा असेल, तर आमच्या सरकारकडूनही त्याची तयारी आहे.

इतक्या जवळ दोन राज्ये राहू शकत नाहीत. तुमच्या ह्या वसाहतीमुळे आमची राजधानी शिरकस्तान ओस पडू लागली आहे. म्हणून आपण येथून निघून जावे अशी आमच्या बादशहाची इच्छा आहे.''

त्यावर राजपुत्र म्हणाला, ''कोतवालसाहेब, मी तर हा महाल येथे शांतपणे अल्लाचे नामस्मरण करता यावे, प्रार्थना करता यावी म्हणून बनविला आहे. मला येथे कोणत्याही प्रकारचे राज्य स्थापावयाचे नाही, की कोणावर हुकुमत चालवायची नाही. आपले बादशहाच माझे बादशहा आहेत. मी त्यांना वडिलांच्या ठायी मानतो.''

राजपुत्राचे हे भाषण ऐकून कोतवाल खूष झाला व तेथून निघाला. त्याने हा अहवाल प्रधानाला सांगितला व प्रधानाने तो बादशहाला निवेदन केला.

ह्यावेळी पुरुषवेषातील गुलबकावली बादशहाच्या दरबारात होती. तिने ही सगळी हकीकत ऐकली आणि तेथे काहीतरी गौडबंगाल असावे. आपले फूल चोरणारा तर तेथे नसेल ना? आपण त्याचा शोध घेतला पाहिजे असे तिने ठरविले.

निगारीन नगरीची सर्व हकीकत ऐकून दरबारी मंडळी व बादशहाही आश्चर्यचकित झाला. आपण स्वत: तेथे जाऊन तो महाल पाहावा असे बादशहाला वाटले आणि त्याप्रमाणे व्यवस्था करण्याची त्याने प्रधानाला आज्ञा केली.

प्रधान दुसऱ्या दिवशी ताजच्या नगरीत पोचला. तो ताजला म्हणाला, ''आपल्या नव्या नगरीची गोष्ट आमच्या बादशहांना कळली. ते आपल्या भेटीला येऊ इच्छीत आहेत. तर आपले काय म्हणणे आहे ते मला कळावे.''

त्यावर राजपुत्र म्हणाला, ''स्वत: बादशहा जर येथे येणार असतील, तर मला अत्यंत आनंद होईल. मी अनेक दिवस त्यांची भेट व्हावी म्हणून इच्छा बाळगीत होतो. मी माझ्या वडिलांप्रमाणे त्यांचे स्वागत करीन.''

हा निरोप बादशहा झैन-उल-मुल्क ह्याला पोचला. बादशहाने राजपुत्राच्या नव्या नगरीला जाण्याची तयारी चालविली आणि राजपुत्राने आपल्या वडिलांच्या स्वागताची. राजपुत्राने अग्नी पेटविला व त्यावर त्याच्याजवळ हम्मालाचा जो एक केस होता तो टाकला. एका क्षणात हम्माला हजर झाली.

राजपुत्र म्हणाला, ''हे माते, तुमच्या आशीर्वादाने आम्ही सर्व खुशाल आहोत; पण लवकरच माझे वडील बादशहा झैन-उल-मुल्क येथे येणार आहेत. तर त्यांना साजेसे त्यांचे स्वागत झाले पाहिजे. त्यासाठी मी आपणाला पाचारण केले आहे.''

''ठीक आहे. बेटा, तुझ्या इच्छेप्रमाणे सर्व व्यवस्था होईल.'' हम्माला म्हणाली, आणि तिने आपल्या अठरा हजार यक्षसेवकांना बोलावून त्या व्यवस्थेला जुंपले.

बादशहाच्या भेटीचा दिवस उगवला. बादशहा आपल्या चार पुत्रांसह, इष्टमित्रांसह व घरच्या मंडळींसह नव्या निगारीन नगरीला निघाला. तो एका मोठ्या हत्तीवर अंबारीत बसला होता आणि गुलबकावली आपल्या पुरुषी वेषात त्याच्या मागे बसली होती. पाठीमागे सरदार मंडळी व शेवटी अफाट सैन्य असा लवाजमा चालला होता.

शिरकस्तानपासून निगारीन नगरीपर्यंत सुंदर रस्ता तयार झाला होता आणि त्या रस्त्यावर मखमलीच्या पायघड्या अंथरल्या होत्या. ठिकठिकाणी सोन्याचे तंबू उभारून

विश्रांतिस्थाने तयार केली होती. तेथे खाण्यापिण्याची सर्व व्यवस्था केली होती. सेवेसाठी हजारो सेवक हजर होते. जाणारी मंडळी ही सर्व व्यवस्था पाहून आश्चर्यचकित झाली.

बादशहाची स्वारी शहराजवळ आली. स्वत: राजपुत्र ताज-उल-मुल्क स्वागतासाठी तेथे हजर होता. त्याने बादशहाचे व इतर सर्वांचे प्रेमाने स्वागत केले. राजवाड्याजवळ आल्यावर तो स्वत: बादशहाच्या सेवेत राहून त्याला महालात घेऊन गेला. त्याला त्याने आरसेमहालात बसविले.

बादशहाने तो महाल पाहिला नि त्याने तोंडात बोट घातले. तेथे ज्या वस्तू होत्या त्या त्याने पूर्वी कधीच पाहिल्या नव्हत्या. हिरेमाणकांचा तर तेथे जणू सडाच होता. महालाच्या प्रत्येक भिंतीला हिरेमाणकांची नक्षी केली होती.

सर्व सैन्य महालाच्या खास केशरबागेत उतरविले होते. बागेची शोभाही अनंतपटीने वाढविली होती. जिकडेतिकडे कारंजी उडत होती आणि पाहुणेमंडळी खाण्यापिण्यात व आनंद उपभोगण्यात गुंग झाली होती.

बादशहा तो महाल व ती तयारी पाहून दिङ्मूढ झाला होता; पण त्यावेळी गुलबकावलीचे विचारचक्र वेगात काम करीत होते. तो महाल तिच्या महालासारखा, बगिचा तिच्या केशरबागेसारखा. त्याचे नावही केशरबागच. ते पाहून तर तिला अधिकच आश्चर्य वाटले. हा देवलोकीचा यक्ष-किन्नर असावा असे तिला वाटू लागले. माझा महाल व बाग तर ह्याने उचलून आणली नाहीत ना, अशी तिला शंका आली.

आपला महाल ठिकाणावर आहे किंवा नाही हे पाहण्याकरिता गुलबकावलीने आपल्या सुमन नावाच्या परीला सांगितले. ती गुलबकावलीबरोबर पुरुषवेष घेऊन राहात असे.

सुमनपरी अदृश्य होऊन तेथून आकाशमार्गे उडाली व एका क्षणात परत येऊन म्हणाली, ''बाईसाहेब, आपला महाल व बाग आहे तेथे स्थिर आहे. त्याची काळजी करू नये.''

आता मात्र गुलबकावलीची खात्री पटली की माझी अंगठी, फूल व माझे हृदयही चोरणारा चोर सापडला. तो हाच माणूस असला पाहिजे.

बादशहाला सोन्याच्या ताटातून पंचपक्वान्नांचे भोजन देण्यात आले. नंतर नाचगाण्याचा कार्यक्रम झाला. हा प्रकार पाहून पाहुणे मंडळी बेहद्द खूष झाली.

इकडे बादशहा व ताजच्या गप्पागोष्टी चालल्या होत्या. ताज म्हणाला, ''महाराज, आपल्याला पुत्र किती आहेत?'' बादशहा म्हणाला, ''मला सध्या चार पुत्र आहेत. एक पाचवा पुत्र होता, पण त्याच्या दर्शनाने मला अंधत्व आले. तेव्हापासून तो पुत्र कुठे गेला, त्याचा पत्ता नाही. पुढे माझ्या ह्या चार पुत्रांनी गुलबकावलीचे फूल आणून मला दृष्टिदान दिले.

राजपुत्र म्हणाला, ''महाराज, त्या आपल्या पाचव्या अभागी पुत्राला कुणी ओळखते की नाही?''

बादशहा म्हणाला, ''त्याला आमचे प्रधानजीच ओळखू शकतील!''

प्रधानाचे लक्ष केव्हाचेच ताज-उल-मुल्ककडे लागले होते. ताजचे बोलणेचालणे प्रधानाच्या नजरेत भरले आणि हाच बादशहाचा पाचवा पुत्र आहे ह्याबद्दल त्याची खात्री पटली. तो म्हणाला, ''बादशहा हुजूर, आपले पाचवे पुत्र हेच आहेत ह्याबद्दल मला कोणताही संशय नाही.'' प्रधानाच्या तोंडून शब्द बाहेर पडले आणि ताज आपल्या

बापाच्या चरणांवर पडला. त्याने बादशहाला साष्टांग नमस्कार घातला.

आपला हरवलेला पुत्र भेटला हे पाहून बादशहाला एकदम आनंद झाला. त्याने राजपुत्राला आलिंगन दिले. त्याच्या तोंडावरून, पाठीवरून प्रेमाने हात फिरविला. तेव्हा ताज म्हणाला, ''अब्बाजान! मी फार दिवसांपासून आपल्या चरणांच्या दर्शनाची वाट पाहात होतो. ती इच्छा आता पूर्ण झाली.''

बादशहा म्हणाला, ''बेटा, हे तुझे वैभव पाहून मी खूष झालो आहे. तुझ्या जन्मकाळीच ज्योतिष्यांनी सांगितले होते की, हा मुलगा फार थोर हाईल व लक्ष्मी याच्या घरी पाणी भरील. पण मला आता सांग, तू लग्न वगैरे केलेस की नाही?''

राजपुत्र म्हणाला, ''अब्बाजान, मी दोन लग्ने केली आहेत. अत्यंत लावण्यवती अशा दोन स्त्रिया आहेत मला. आपली आज्ञा असेल तर मी आपल्या-सेवेस त्यांना हजर करतो.''

बादशहाने होकार दिला व राजपुत्राने आपल्या दोन्ही बेगमांना बोलाविले; पण त्या बादशहाच्या पुढे न येता पडद्याआड उभ्या राहिल्या. त्या बादशहासमोर यायला तयार होईनात.

तेव्हा बादशहा त्यांना म्हणाला, ''मुलींनो, तुम्ही संकोच बाळगू नका.'' यावर राजपुत्र म्हणाला, ''पिताजी, त्या आपल्याबद्दल संकोच बाळगीत नाहीत तर त्या येथे असलेल्या गुलामांच्या समोर येऊ इच्छीत नाहीत. क्षमा करा त्यांना.''

बादशहा म्हणाला, ''येथे कोण आहे गुलाम?''

राजपुत्र म्हणाला, ''हे आपले चार पुत्र.''

बादशहा म्हणाला, ''राजपुत्र आणि गुलाम ?''

राजपुत्र म्हणाला, ''होय पिताजी, आपले हे चौघे पुत्र माझ्या एका पत्नीचे गुलाम आहेत. त्याची खूण म्हणून त्यांच्या पाठीवर गुलामगिरीचे शिक्के आहेत.''

राजपुत्राचे हे बोलणे ऐकून त्या चौघाही राजपुत्रांना पराकाष्ठेचे लाजल्यासारखे झाले. ते लाजेने खाली माना घालून तेथून निघून गेले. बादशहा हे पाहून मनात दचकला.

इतक्यात ताजच्या दोन्ही राण्या बादशहापुढे आल्या आणि त्यांनी बादशहाला नमस्कार केला. त्यांचे सौंदर्य पाहून बादशहाला आनंद झाला. मग ताज-उल-मुल्कने आपली सर्व हकीकत बादशहाला सांगितली. गुलबकावलीचे फूल आपण कसे प्राप्त केले आणि आपल्या भावांनी ते कसे हिरावून घेतले वगैरे सर्व हकीकत त्याने अगदी इत्थंभूत सांगितली.

बादशहाला आपल्या चार पुत्रांचा ह्या अमानुष व्यवहाराबद्दल फार राग आला आणि त्याने त्यांचे सगळे वैभव काढून घेऊन त्यांना राज्यातून हद्दपार केले. ताज-उल-मुल्कच्या आईची ताबडतोब सुटका करून तिला बोलावून आणविले व तिला पट्टराणी केले.

आपला पुत्र दिसताच तिने राजपुत्राच्या गळ्याला मिठी मारली आणि आपल्या अश्रूंनी त्याच्या डोक्यावर अभिषेक केला. ते दृश्य पाहून सर्व मंडळींच्या डोळ्यांतून आनंदाश्रू टपकले.





भाग

१२



# प्रियकराचा शोध लागला



बादशहा आपल्या राजधानीला परत आला तेव्हा त्याच्याबरोबर पुरुषवेषधारी गुलबकावलीही परत आली; पण ती आता तेथे अधिक काळ थांबायला तयार नव्हती. तिला आता आपल्या प्रियकराचा शोध लागला होता. तिने आपल्या बोटातील अंगठीवरील चित्राशी चांगले ताडून पाहिले. फूल तोडून नेणारा ताज-उल-मुल्कच होता. आता आपण आपल्या प्रियकराला गाठले पाहिजे असा विचार करून तिने बादशहाची परवानगी घेतली आणि तेथून ती रवाना झाली ती आपल्या इरमच्या महालात.

इथे आल्यावर तिने प्रेमपत्र लिहिले. ते पत्र आणि तिच्या-जवळील ताजची अंगठी ह्या दोन वस्तू सुमनपरीजवळ दिल्या आणि तिला ताज-उल-मुल्ककडे रवाना केले. हीच सुमनपरी गुलबकावलीबरोबर बादशहाच्या दरबारी पुरुषवेष घेऊन राहात असे. तिने ताज-उल-मुल्कला चांगले पाहिले होते. सुमनपरी तेथून आकाशमार्गे जी उडाली ती क्षणभरात ताज-उल-मुल्कच्या महालावर उतरली. ताज आराम करीत आहे अशी संधी साधून तिने त्याची गाठ घेतली आणि त्याला नमस्कार करून ते पत्र आणि अंगठी नजर केली.

ती अंगठी पाहताच ताजच्या चेहऱ्यावर एकदम आनंदाची लहर उसळली. त्याने ते पत्र उघडले व वाचू लागला.

हे मम प्राणप्रिया, प्रिय ताज-उल-मुल्का, माझे लाख लाख सलाम.

हे सख्या, तुला आठवत असेल की, काही दिवसांपूर्वी तू मोठ्या कडक बंदोबस्तातून पहारा चुकवून माझ्या बागेत शिरलास; माझा जीव की प्राण असे फूल चोरून नेलेस. माझ्या महालात शिरून अंगठ्यांची अदलाबदल करून निघून गेलास.

माझ्या शरीराला स्पर्श करणारा तू पहिला पुरुष आहेस. तेव्हापासून मी माझे हृदय तुझ्या स्वाधीन केले आहे. तू ये आणि मला दर्शन दे. माझे प्राण डोळ्यांत येऊन तुझ्या वाटेकडे लागले आहेत. ह्या चिठ्ठीचे उत्तर दे आणि ताबडतोब माझे मन शांत कर. पुन्हा माझे लाख लाख सलाम.

तुझ्या प्रेमाची दासी
गुलबकावली परी

ताजने ते पत्र वाचले. त्या पत्रातील शब्दन्‌शब्द प्रेमाचा संदेश देत होता. ताजच्या हृदयातील इश्काची सुप्त आग भडकून उठली आणि तो गुलबकावलीसाठी जणू पागल झाला. त्याने मनाला शांत केले व पत्राचे उत्तर लिहिले.

हे लाडके गुलबकावली,

तुझे पत्र पोचले. अंगठी पाहताच मला फार फार आनंद झाला. मी तुला जेव्हा पाहिले तेव्हापासून तुझी मूर्ती सतत माझ्या डोळ्यांपुढे असते. मी तर तुझे नाव ऐकूनच प्रेमपागल झालो आहे. तुझ्या आठवणीने मी घायाळ होत आहे.

आता तू म्हणतेस, मी इरम येथे यावे तर ते कसे शक्य आहे ? आकाशातून उडण्याचे सामर्थ्य माझ्या अंगी नाही. मी एक साधा मानवप्राणी आहे. आता तू जे काही करशील ते मला कबूल आहे. प्रेमाची वृद्धी व्हावी.

तुझा प्रिय
राजपुत्र ताज-उल-मुल्क

ताजने गुलबकावलीची अंगठी व ते पत्र लिफाफ्यात बंद केले आणि सुमनपरीजवळ दिले. तिने ताजला नमस्कार केला व ती आकाशमार्गे उडाली. क्षणभरात ती गुलबकावलीच्या समोर जाऊन उभी राहिली. तिने पत्र व अंगठी तिच्या स्वाधीन केली आणि ताजकडील हालहवाल कथन केली.

❀ ❀ ❀

## भाग १३

## गुलबकावली संकटात सापडली

ताज-उल-मुल्कने लिहिलेले पत्र गुलबकावलीने वाचले. तिने लगेच सुमनपरीला आज्ञा केली की आत्ताच्या आत्ता हम्मालाला बोलावून आण.

हम्माला क्षणातच येऊन गुलबकावलीसमोर उभी राहिली. तिला पाहताच गुलबकावली चांगलीच संतापली. तिचा तो अवतार पाहून हम्माला घाबरली.

बकावली म्हणाली, ''अगे विश्वासघातिनी, तू एका मानवाला माझ्या बागेत पोचविलेस, त्याला माझे आवडते फूल प्राप्त करून दिलेस. शेवटी त्याने माझ्या शरीराला स्पर्श केला. त्याला तू आपला जावई करून घेतलास आणि माझ्या महालाप्रमाणे महाल व बगिचाही तयार करून दिलास. मी जिवंत राहावे असे तुला वाटत असेल तर त्याला ताबडतोब घेऊन ये.''

हम्माला तेथून उडाली ती शिरकस्तानला जाऊन पोहोचली व राजपुत्रासमोर हजर झाली. ती ताजला म्हणाली, ''गुलबकावलीने तुला बोलाविले आहे.''

ताज ताबडतोब तयार झाला. हम्मालाने त्याला उचलून खांद्यावर घेतले आणि ती आकाशमार्गे इरमला निघाली.

इकडे बकावलीची आई तिच्या महालात आली आणि म्हणाली, ''बेटी, तू अनेक दिवस येथून नाहीशी झाली होतीस. कुठे गेली होतीस ? आणि आता ही अशी इश्काच्या ज्वालेने जळून भस्म होत आहेस. असा आहे तरी कोण तुला मोहित करणारा ? कुणी यक्ष-किन्नर-गंधर्व आहे काय ?''

पण गुलबकावली काही बोलली नाही. शेवटी नाइलाज होऊन तिची आई तेथून परत गेली. इकडे हम्माला राजपुत्राला घेऊन आली. तिने त्याला गुलबकावलीच्या महालात हजर केले आणि ती निघून गेली. ही वेळ रात्रीची होती. आपला प्रियकर मिळाल्यावर गुलबक्कावली आनंदाने बेहोष होऊन त्याच्या गळ्यात पडली आणि त्यांच्या गोष्टींना सुरुवात झाली. रात्र बरीच झाली होती. रात्री आपल्या मुलीची काय अवस्था असते हे पाहण्याच्या हेतूने आज गुलबक्कावलीची आई गुप्तपणे तिच्या महालात येऊन हजर झाली आणि पाहते तो गुलबकावली एका मनुष्याबरोबर प्रणयात रंगून गेलेली. ते दृश्य पाहून तिला त्या दोघांचा राग आला आणि रागाच्या भरात तिने राजपुत्राची तंगडी धरून त्याला आकाशात खूप जोराने फेकून दिले. गुलबकावलीला चांगला चोप दिला आणि म्हणाली, ''तू पऱ्यांच्या वंशाला कलंक लावलास.''

बकावली रडू लागली. तिने आईच्या पायावर डोके ठेवले आणि म्हणाली, ''तू माझ्यावर का रागावलीस ? मला प्रेम

काय हे माहीतसुद्धा नाही आणि माणूस तर मी स्वप्नातही पाहिला नव्हता.''

''मग तो येथे आला कसा? त्याला येऊ कसा दिलास?'' आई म्हणाली.

गुलबकावली बोलू लागली, ''तो येथे माझ्या महालात आला. मी झोपले असताना त्याने अंगठ्यांची अदलाबदली केली. आता त्याच्या अंगाचा स्पर्श मला झाला. त्यामुळे मी सर्वस्वी त्याची झाले आहे. त्या राजपुत्राशिवाय मी जगू शकणार नाही.''

बकावलीच्या आईने तिची ही हकीकत बकावलीच्या बापाला सांगितली. तिचा बाप इरमचा बादशहा फेरोजशहा याच्यापुढे तिने बकावलीला उभी केली.

तिची ही हकीकत ऐकून बकावलीच्या बापाला तिचा फार राग आला. त्याने तिला कैद करून तिच्यावर अनेक पऱ्यांचा सक्त पहारा नेमला.

कैदेत गुलबकावली रात्रंदिवस राजपुत्राचा ध्यास करीत होती. तिला खाणे-पिणे सुचेना, कपड्यालत्त्याकडेही तिचे लक्ष नसे. ती वेडी झाल्यासारखी वागू लागली.

❀ ❀ ❀

## भाग १४

## राजपुत्र जादूच्या दुनियेत

बकावलीच्या आईने राजपुत्राला तंगडी धरून आकाशात फेकून दिले होते. तो भरवेगाने शेकडो कोस दूर जाऊन

समुद्रात पडला. दोन दिवस पोहत राहून त्याला समुद्रातून मार्ग काढावा लागला आणि अखेर तो जमिनीवर येऊन पोचला.

तो दोन-तीन दिवसांचा उपाशी होता आणि अतोनात थकला होता. त्याला खूप श्रम पडले होते. त्यामुळे त्याला खूप भूक लागली होती. काहीतरी खायला मिळावे म्हणून तो इकडेतिकडे पाहू लागला. तेव्हा आपण एका महाभयंकर जंगलात असल्याचे त्याला दिसले.

त्या अरण्यात त्याला एक बगिचा नजरेस पडला. त्या बागेत झाडे होती आणि ती झाडे फळांनी लवून गेली होती. फळांच्या आशेने तो धावतच एका झाडाजवळ गेला. पाहतो तो ती फळे नसून माणसांची मुंडकी झाडाला लटकलेली होती. ताज जवळ जाताच ती मुंडकी खदखदा हसू लागली आणि पटापट जमिनीवर पडली. ते भयानक दृश्य पाहून तो फारच घाबरला.

तेथून तो पुढे गेला. तेथे त्याला दुसरा बगिचा दिसला. त्या बागेत डाळिंबाची झाडे होती. प्रत्येक झाडाला मोठ्या घागरीएवढी डाळिंबे लागली होती. ती पाहून राजपुत्राला फार आनंद झाला. त्यापैकी एक डाळिंब घ्यावे, फोडावे व खावे आणि आपली भूक भागवावी असे त्याला वाटले.

त्याने एक डाळिंब तोडले व फोडले, पण त्यातून दाणे न निघता पांढरेशुभ्र पक्षी निघाले आणि ते सर्व क्षणभरात आकाशात उडून गेले. ह्याचेही त्याला फार नवल वाटले. तो निराश झाला आणि अन्न अन्न करीत भटकू लागला.

अशा प्रकारे तो त्या अरण्यात भटकत होता व नित्य नवे प्रकार पाहात होता. शेवटी तो हिंस्र प्राण्यांच्या धाकाने रात्री एका झाडावर जाऊन बसला.

अर्धरात्र झाली असेल एवढ्यात त्याला सापाचा एक फार मोठा फूत्कार ऐकू आला. तो सावध झाला आणि पाहू लागला. तो एक भयंकर साप होता. तो त्याच झाडाखाली आला. तेथे त्या सापाने आपल्या तोंडातून एक लहान काळा साप काढला. त्या काळ्या सापाने आपल्या तोंडातून एक अत्यंत तेजस्वी मणी बाहेर काढला व जमिनीवर ठेवला.

त्या मण्याचा प्रकाश मैलचे मैल जात असे. त्या प्रकाशात अनेक प्राणी तेथे येत आणि मग त्या प्राण्यांची शिकार करून ते दोन्हीही सर्प आपली उपजीविका करीत.

अशा प्रकारे आजचे खाद्य मिळाल्यावर काळ्या सापाने तो मणी गिळला आणि तो मोठा साप त्या काळ्या सापाला गिळून तेथून निघून गेला.

हा मणी प्राप्त करून घ्यावा असे राजपुत्राला वाटले. त्याबद्दल तो विचार करू लागला व शेवटी त्याला एक युक्ती सुचली.

दुसऱ्या दिवशी तो समुद्रकिनाऱ्यावर गेला. चांगला चिकणा चिखल पाहून त्याने त्या चिखलाचा एक मोठा गोळा बनविला. तो चिखलाचा गोळा घेऊन तो झाडाजवळ आला नि त्यावर बसून राहिला. रात्र झाली. साप आला. त्याच्या तोंडातून काळा साप बाहेर पडला. त्या काळ्या सापाने मणी बाहेर काढला व ते दोघे तेथे येणाऱ्या प्राण्यांची शिकार करण्यात गुंग झाले.

एवढ्यात राजपुत्राने बरोबर नेम धरून तो चिखलाचा गोळा फेकला तो नेमका त्या मण्यावर. मणी झाकला गेला व अरण्यात अंधार पडला. त्याबरोबर त्या दोन्ही सर्पांनी डोकी आपटून आपटून आपले प्राण सोडले.

दुसऱ्या दिवशी सकाळी राजपुत्र खाली उतरला. त्याने तो अत्यंत तेजस्वी पृथ्वीमोलाचा मणी घेतला व तो तेथून निघाला.

तो खूप भटकला, पण त्याला मार्ग कोठे सापडेना. तो रात्री एका झाडावर चढून बसला आणि विश्रांती घेऊ लागला. त्या झाडावर एका मैनेचे घरटे होते. तिची दोन-तीन पिले होती. ती मैना त्या पिलांना दररोज निरनिराळ्या गोष्टी सांगत असे. त्या दिवशी ती पिले म्हणाली, ''आई, आम्हाला आज आपल्या ह्या जंगलाविषयीची माहिती सांग बरे!''

मैना म्हणाली, ''ठीक आहे. ऐका तर -

हे जंगल फार मोठे आहे. येथून थोड्या अंतरावर दक्षिण दिशेला एक हौद आहे. तेथे एक फार मोठे झाड आहे. त्या झाडाच्या सालीत असा गुण आहे की, त्या सालीची टोपी करून घातली तर ती घालणाऱ्याला सगळे काही दिसते, पण तो मात्र कोणाला दिसत नाही. परंतु त्या झाडापर्यंत कुणीही जाऊ शकत नाही कारण तेथे एक महाभयंकर काळा भुजंग त्याची रखवाली करीत असतो. त्यावर तरवार किंवा तीरही चालत नाही. जर त्या सापाला न भिता त्याला उडवून कोणी तेथपर्यंत गेला आणि त्याने त्या हौदात चटकन उडी मारली तरच तो जिंकला म्हणून समजावे. त्यावेळी त्याला कावळ्याचे स्वरूप प्राप्त होते. त्या वृक्षावर दोन तऱ्हेची फळे आहेत. त्यापैकी लाल फळ खाल्ले की त्याला पूर्वस्वरूप प्राप्त होते व त्याने दुसरे हिरवे फळ खाल्ले की तो आकाशमार्गाने उडू लागतो. त्या वृक्षाच्या पानात अशी जादू आहे की, ती जखमेवर वाटून लावली की मोठी जखमही तात्काळ बरी होते आणि त्या वृक्षाच्या काठीचा स्पर्श झाला की, मोठमोठ्या लोखंडी सळ्या व मोठमोठी कुलपे तुटून पडतात.''

ती पक्षीण ही गोष्ट आपल्या पिलांना सांगत होती आणि राजपुत्र ऐकत होता. त्याला वाटले की, आपण जरूर ह्या गोष्टीची दखल घेतली पाहिजे. तो सकाळी उठून त्या हौदाकडे गेला. त्याला ते ठिकाण आढळले आणि तो लपत छपत जाऊन त्या हौदाच्या काठावर उभा राहिला. इतक्यात तेथील भयंकर भुजंगाची नजर त्याच्यावर गेली. त्याने मोठा फूत्कार सोडला व तो त्याच्या अंगावर धावला, पण राजपुत्राने ताबडतोब त्या हौदात उडी मारली. लगेच त्याला कावळ्याचे रूप प्राप्त झाले व तो क्षणाचा विलंब लागू न देता त्या झाडावर जाऊन बसला.

कावळ्याने ताबडतोब त्या झाडाचे लाल फळ खाल्ले आणि पुन्हा तो राजपुत्र बनला. नंतर त्याने त्या झाडाचा पाला घेतला, त्याची काठी तोडून घेतली; टोपीसाठी साल काढून घेतली, लाल-हिरवी फळे घेतली आणि हिरवे फळ त्याने डोक्यावर ठेवले. मग तेथून तो उडाला. तो खूप लांब जेथे वस्ती दिसली तेथे उतरला. रात्री त्याने गावाच्या धर्मशाळेत मुक्काम केला. त्याने त्या रात्री आपली मांडी चिरली, तिच्यात तो तेजस्वी मणी भरला आणि वर त्या झाडाचा पाला लावून क्षणभरात ती जखम बरी केली.





भाग १५

# राक्षसाशी भयंकर युद्ध



त्या जादूवृक्षावरून मिळविलेल्या महिम्याच्या योगाने ताज आता आकाशात उडू शकत होता. एके दिवशी तो आकाशातून उडत जात होता. तो त्याला एक अत्यंत उंच पर्वत दिसला व त्याच्या शिखरावर एक सुंदर संगमरवरी महाल दिसला. त्या महालाचे सौंदर्य पाहात असता त्याला तेथे कोणाच्यातरी रडण्याचा आवाज ऐकू आला. तो त्या आवाजाच्या मागावर महालात गेला आणि पाहतो तो काय! एका सजलेल्या पलंगावर एक अत्यंत सुंदर तरुणी रडत आहे.

राजपुत्र तिच्याजवळ गेला आणि तिला म्हणाला, ''हे सुंदरी, तू अशी का रडत आहेस ? तुझ्यावर काही संकट आले आहे का ? तसे असेल तर मला सांग. मी त्यातून तुझी सुटका करीन.''

ताजला पाहून ती म्हणाली, ''महाराज, तुम्ही येथून निघून जा. येथे तुमचे प्राण धोक्यात आहेत.'' राजपुत्र म्हणाला, ''त्याची चिंता तू करू नकोस, पण खरा प्रकार काय तो मात्र मला स्पष्ट सांग.''

ती म्हणाली, ''महाराज, मी एक परी आहे. माझे नाव रूहअफजा. जंजीरे फिरदोश शहराचा बादशहा मुजफ्फरशहा माझे पिता. सध्या तेच राज्य करीत आहेत. एके दिवशी माझी चुलतबहीण गुलबकावली आजारी असल्यामुळे मी तिला भेटायला इरम येथे गेले होते. तेथे काही दिवस राहिल्यानंतर

मी परतले. वाटेत एका राक्षसाने माझ्यावर झडप घातली, मला पकडले आणि येथे आणून कोंडून ठेवले आहे.''

गुलबकावली आजारी आहे, ही हकीकत परीच्या तोंडून ऐकताच राजपुत्र फार दु:खी झाला. त्याच्या नेत्रांतून आसवांची धार वाहू लागली आणि तो रडू लागला.

तो तरुण रडताना पाहून परीला फारच नवल वाटले आणि ती म्हणाली, ''हे सुंदर तरुणा, गुलबकावलीची हकीकत ऐकून तुला रडे का आले ? तुझे तिचे काय संबंध आहेत ?''

राजपुत्र म्हणाला, ''हे सुंदरी, ज्या मनुष्यावर गुलबकावलीचे प्रेम आहे, तो दुर्दैवी तरुण मीच आहे.'' मग त्याने आपली व गुलबकावलीची संपूर्ण कहाणी त्या परीला सांगितली.

परीला त्या राक्षसाने साखळदंडांनी बांधून ठेवले होते. राजपुत्राने ताबडतोब आपल्याजवळील जादूची काठी मारून तिची बेड्यांतून सुटका केली. तिने लगेच राजपुत्राला त्या राक्षसाचे शस्त्रागार दाखविले. त्यातून त्याने एक उत्तम तरवार व एक कट्यार घेतली. ती दोघेही त्या राक्षसाच्या महालातून बाहेर पडली आणि जंजीरे फिरदोश शहराकडे निघाली.

राजपुत्राने आपल्याजवळील जादूची टोपी काढली आणि रूहअफजाच्या डोक्यावर ठेवली. ती ताबडतोब दिसेनाशी झाली. इतक्यात तो राक्षस तेथे येऊन पोचला.

दोघे समोरासमोर आले. राक्षसाने त्याला पाहून अगदी विकट हास्य केले. नंतर दातओठ खाऊन रागाने पाहिले आणि म्हणाला, ''हे माणसा, तुला मारणे म्हणजे एक माशी मारण्यासारखे आहे. तुला जीव प्यारा असेल, तर तू माझी प्रिया मला परत दे आणि आलेल्या मार्गाने निघून जा. नाहीतर तुझ्या प्राणांची खैर नाही; असे म्हणून त्याने शंभर मणांचा

एक फार मोठा दगड उचलला आणि राजपुत्राच्या अंगावर फेकला. पण राजपुत्रही सावध होता. तो तावडतोब आकाशात उडाला आणि त्याने आपल्याजवळची काठी अशा तऱ्हेने त्या राक्षसाच्या मानेवर मारली की, त्याचे शरीर कंपायमान झाले. त्याने महाभयंकर गर्जना केली. त्या गर्जनेने तो सगळा पर्वत दणाणून गेला आणि राक्षस मरून पडला.

अनेक दिवसांच्या प्रवासानंतर ती दोघे तेथून जंजीरे फिरदोश शहराजवळ येऊन पोचली. परीने राजपुत्राला एका बागेच्या कुंजात लपवून ठेवले. त्याला तेथे सोडून परी आपल्या घरी गेली व तिने आई-वडिलांची भेट घेतली. अनेक दिवस नाहीशी झालेली आपली कन्या आलेली पाहून त्यांना अत्यानंद झाला. त्यांनी तिला आपल्या गळ्याशी लावले.

नंतर रूहअफजाने आपली सर्व हकीकत अगदी इत्थंभूत कथन केली. राजपुत्र ताज-उल-मुल्कने राक्षसाच्या हातून आपली कशी सुटका केली, हे तिने सांगितले आणि तो राजपुत्र आपल्या बागेत आहे असे सांगितले.

लगेच तिचा बाप बागेत गेला. त्याने राजपुत्राला आलिंगन दिले. आपल्या मुलीला वाचविल्याबद्दल त्याचे आभार मानले. त्याचे उत्तम स्वागत केले आणि त्याची तेथे राहण्याची सोय केली. त्याच्या सेवेला दासदासी आणि पऱ्या नेमून दिल्या. राजपुत्र तेथे सुखाने राहू लागला.





भाग १६

## राजपुत्र व गुलबकावली यांची भेट

रूहअफजा घरी पोचली. तिच्या वडिलांनी ती एका मोठ्या संकटातून बचावून घरी सुखरूप पोचल्याचे पत्र आपला भाऊ फेरोजशहा ह्याच्याकडे इरम येथे रवाना केले.

फेरोजशहाने ते पत्र वाचले आणि तो एकदम आनंदित झाला. लगेच त्याने आपल्या बायकोला बोलाविले आणि सांगितले की, रूहअफजा एका राक्षसाच्या तावडीतून सुखरूपपणे सुटून घरी पोचली आहे. तर तू आता तिला भेटायला जा.

आई रूहअफजाच्या भेटीला जात आहे ही खबर गुलबकावलीला कळली आणि तिने तावडतोब आईला निरोप पाठविला की, मीही तुझ्याबरोबर येते. लगेच तिच्या आईने ही गोष्ट तिच्या बापाच्या कानावर घातली. त्याने बकावलीची सुटका केली व तिला आईबरोबर जाण्यास परवानगी दिली.

गुलबकावली व तिची आई रूहअफजाच्या घरी पोचल्या. त्यांची भेट झाली. गुलबकावलीच्या आईने रूहअफजाला हृदयाशी धरले. तिच्या तोंडावरून हात फिरविला. इकडच्या तिकडच्या गप्पागोष्टी झाल्या आणि रूहअफजाने गुलबकावलीच्या कानात हळूच सांगितले की, 'हे हसीन गुल, तुला शंभर वर्षे आयुष्य लाभो. तुझ्या प्रियकराने मला दुष्ट राक्षसाच्या मगरमिठीतून सोडविले आहे.'

रात्री गुलबकावलीच्या आईला मोठी मेजवानी देण्यात आली. गप्पागोष्टी झाल्या. रूहअफजावर आलेल्या संकटाची

सर्व हकीकत गुलबकावलीला आणि तिच्या आईला सांगण्यात आली.

गुलबकावलीची प्रकृती सुधारावी म्हणून तिच्या आईने तिला तेथेच ठेवले व ती दुसऱ्या दिवशी तेथून इरमला रवाना झाली.

एके दिवशी रूहअफजा व गुलबकावली ह्या दोघी गप्पा करीत बसल्या होत्या. गप्पा चालता चालता त्या प्रेम व इश्कावर येऊन पोचल्या. त्या गोष्टींच्या रंगात रूहअफजाने राजपुत्र ताज-उल-मुल्कचा उल्लेख केला. पण तो उल्लेख ऐकताच गुलबकावली लाजली आणि म्हणाली, ''कुठे मी परी आणि कुठे तो माणूस! हा केवळ तुझा तर्क आहे.''

अशा प्रकारच्या गप्पागोष्टींत गुलबकावलीला रमवून तिचा हात धरून रूहअफजाने तिला बागेत आणले आणि ताज-उल-मुल्क ज्या महालात मुक्काम करून होता, तिकडे तिच्या नकळत तिला नेले.

त्या दोघी महालाजवळ गेल्या. आतून एक दु:खाने भरलेला आर्त स्वर त्यांच्या कानी आला.

गुलबकावली तो ऐकून बेचैन झाली. तिने तो आवाज ओळखला. त्या आवाजातील दु:ख ओळखले. त्यातील हाक ओळखली. तिने विचारले, ''हे रूह, हा आवाज कोणाचा?'' रूह म्हणाली, ''ताई, हा आवाज एका प्रेमवेड्याचा आहे. तो आपल्या प्रियकरणीसाठी वेडा झाला आहे. चल, जरा तुला त्याची गंमत दाखविते.''

मग त्या दोघी त्या महालात शिरल्या आणि राजपुत्राच्या एकदम समोर आल्या.

राजपुत्र आणि गुलबकावली यांची नजरानजर झाली. दोघांनीही एकमेकांना मिठ्या मारल्या. दोघे मन मोकळे करून

रडली. बराच वेळ तेथे कोणी एक शब्द बोलत नव्हते. रूहअफजा तेथून जरा बाजूला झाली, मग त्या प्रेमी युगुलाने प्रेमामृताचे मनमुराद प्राशन केले.

नंतर गुलबकावली रूहअफजाला म्हणाली, ''माझी सगळी प्रेमकहाणी तुला माहीत आहे. आता माझ्या कल्याणासाठी तुला काही करता आले तर ते तू कर. तू करशील ते मला मंजूर आहे.''

बकावलीची मुदत संपली व ती इरमला जायला निघाली. दोघा प्रेमिकांची वियोगामुळे पुन्हा तीच वेड्यासारखी अवस्था झाली. दोघे एकमेकांना सोडायला तयार नव्हते. दोघांनी गळ्यात गळा घालून आपला शेवट करून घ्यावा, असा विचार केला पण -

पण रूहअफजा म्हणाली, ''असे वेड्यासारखे वागल्याने कार्याचा नाश होईल व प्राणही जातील. म्हणून तुम्ही आता माझे थोडे ऐका. मी तुमची ही भेट घडवून आणली. त्याप्रमाणे तुम्हा दोघांचे शुभमंगलही घडवून आणीन.''

रूहची विनंती ऐकून गुलबकावली आपल्या वडिलांच्या घरी इरमला गेली आणि तेथे आनंदाने राहू लागली.

❀ ❀ ❀

## भाग १७

## गुलबकावलीचे लग्न ठरले

इकडे रूहअफजाने गुलबकावली व ताज-उल-मुल्कची प्रेमकहाणी संपूर्णपणे आपली आई हुस्नआरा हिला

सांगितली. ती ऐकून हुस्नआरा विचारात पडली. ती म्हणाली, ''अग, परी आणि माणूस ह्यांचे लग्न कधी शक्य आहे काय ?''

रूह म्हणाली, ''लग्नाच्या आधीच तर ती एकमेकांची झालेली आहेत. मग लग्नालाच फक्त हरकत घेऊन उपयोग काय ?'' हुस्नआरा म्हणाली, ''त्या राजपुत्राने तुझे प्राण वाचविले आहेत. मग त्याच्यासाठी काही करणे हे माझे कर्तव्य ठरते.''

त्यानंतर तिने एक चांगला चित्रकार बोलाविला व त्याच्याकडून राजपुत्राचे सुंदर चित्र काढून घेतले. ते चित्र घेऊन ती इरमला रवाना झाली. तेथे ती गुलबकावलीच्या आईवडिलांना भेटली. तिने काही दिवस तेथे मुक्काम केला. एक दिवस गप्पा करता करता तिने गुलबकावलीच्या आईजवळ गोष्ट काढली. ती म्हणाली, ''ताई, तू गुलबकावलीला आणखी किती दिवस अशी ठेवणार ? तिचे लग्नाचे वय तर कधीच झाले आहे.''

गुलबकावलीची आई म्हणाली, ''हे हुस्नआरा, तुला माहीतच आहे की, गुलचे मन एका मानवजातीच्या पुरुषावर जडले आहे. तिने तर त्याचे वेडच घेतले आहे.''

हुस्नआरा म्हणाली, ''तुझे म्हणणे ठीक आहे. अग, मानव काय आणि पऱ्या काय, दोघेही एकाच परमेश्वराने उत्पन्न केली ना ? मग त्या माणसाबरोबर बकावलीचे लग्न व्हायला का हरकत असावी ?''

गुलबकावलीची आई म्हणाली, ''हुस्नआरा, ते काही असो. पण मला व गुलच्या वडिलांना हे संबंध पसंत नाहीत.''

नंतर हुस्नआराने राजपुत्राचे आपल्याजवळील चित्र काढून गुलच्या आईला दाखविले अन् ती म्हणाली, ''ताई, बघ बरे किती चांगला पुरुष आहे हा! किती सुंदर, किती शूर. ह्यानेच आपल्या रूहअफजाला राक्षसाच्या तावडीतून सोडविले. शिरकस्तानचा शाहजादा आहे तो. मनुष्य आहे म्हणून काय झाले!''

गुलबकावलीच्या आईने ते चित्र पाहिले व ती त्या माणसावर खरोखरच मनापासून खूष झाली. ती म्हणाली, ''खरेच ग, किती सुंदर हा माणूस! हा तर यक्षांवर ताण करणारा दिसतो. मी देईन त्याला गुलबकावली.''

हुस्नआरा म्हणाली, ''अग ताई, आपल्या परी असण्याचा गर्व सोडून दे आणि तुझी गुल दे त्याला. हाच तुझ्या गुलचा प्रियकर. आता नाही म्हणू नकोस.'' गुलबकावलीच्या आईने शेवटी होकार दिला व गुलच्या वडिलांकडूनही संमती मिळविण्याची हमी घेतली.

ते चित्र पाहून फेरोजशहा पण खूष झाला आणि त्यानेही राजपुत्र व गुलबकावलीच्या लग्नाला संमती दिली. सर्वजण लग्नाच्या तयारीला लागली.

इकडे हुस्नआरा आपल्या गावी गेली आणि तिने राजपुत्राला सगळी हकीकत कथन केली.



भाग १८

# गुलबकावलीचे लग्न झाले

इकडे फेरोजशहाने सुमनपरीच्या हातून ते राजपुत्राचे चित्र गुलबकावलीकडे पाठविले आणि तिच्याबरोबर निरोप दिला की, 'हा शिरकस्तानचा राजपुत्र असून ह्याला तुझ्यासाठी वर नेमस्त केले आहे. हा पण माणूसच आहे. तू ज्या मनुष्यावर प्रेम करीत आहेस, ते सोडून दे व ह्याच्याबरोबर लग्नाला तयार हो.'

सुमनपरीने ते चित्र आणून बकावलीला दिले व फेरोजशहाचा निरोप सांगितला. ते सर्व ऐकून व ते चित्र पाहून गुलबकावली खूष झाली.

बादशहा फेरोजशहाने गुलबकावलीच्या लग्नाची घोषणा केली. राजवाडा शृंगारण्यात आला. सारे शहर शृंगारण्यात आले.

तिकडून मुझफ्फरशहा व हुस्नआरा ह्यांनी लग्नाची तयारी केली. राजपुत्राला सजविले, नटविले आणि वाजतगाजत वराला घेऊन इरम राजधानीत ती दोघे हजर झाली.

इकडे स्त्रियांनी गुलबकावलीला लग्नाचा साज चढविला. लग्नासाठी दूरदूरचे पाहुणे आले. लग्नमंडपात सर्व मंडळी बसली आणि लग्नविधीला सुरुवात झाली. यथासांग लग्न पार पडले. रात्री नाचरंग पार पडला आणि हे दोघे जीव आपल्या प्रेमामृताचा आनंद लुटण्यात गुंग झाले. त्यांच्या अनेक दिवसांच्या आशा पूर्ण झाल्या.

थोड्याच दिवसांत सगळी पाहुणी मंडळी आपापल्या गावी निघून गेली आणि ताज व गुल ही प्रेमामृतपानात गुंग होऊन आपले दिवस मजेत घालवू लागली.

❋ ❋ ❋



## भाग १९ — गुलबकावली देशाला रवाना झाली

काही दिवस सुखोपभोगांत घालविल्यावर ताजने आपल्या देशी जाण्याची इच्छा प्रकट केली.

मग दोघांनी फेरोजशहा व बकावलीची आई जमिलाखातून ह्यांची संमती मिळविली आणि ती जाण्याच्या तयारीला लागली. फेरोजशहाने गुलबकावलीबरोबर खूप संपत्ती दिली. अनेक गुलाम व दासदासी दिल्या. त्या दोघांना आलिंगने देऊन शिरकस्तानला रवाना केले.

मजल-दरमजल कूच करीत हा लवाजमा शिरकस्तानला येऊन पोचला. राजपुत्र आला आहे ही खबर कळताच बादशहाला आनंद झाला. त्याला पाहून दिलवर व महमुदा ह्यांना अत्यानंद झाला. त्यांच्या आशा पुन्हा फुलून निघाल्या; पण -

पण त्यांनी गुलबकावलीकडे पाहिले, तो तिचे अप्रतिम सौंदर्य पाहून त्या थक्क झाल्या आणि काहीशा खिन्नही. त्यांच्या मनात अशी शंका आली की, राजपुत्र हिच्या सौंदर्यावर मोहित होऊन आम्हाला विसरला तर....

राजपुत्र राजवाड्यात गेला. बादशहा झैन-उल-मुल्कने त्याच्या गळ्याला मिठी मारली. ताजने आपल्या वडिलांना नमस्कार केला. आपला मुलगा आल्याची बातमी आईलाही कळली. ती धावत आली आणि तिने त्याला मिठी मारली. तिच्या डोळ्यांतून आनंदाश्रू वाहू लागले. गुलबकावलीला पाहून ती खूष झाली.

नंतर ताज व गुल दिलवर आणि महमुदाबरोबर त्यांच्या महालात गेली. गुल त्या दोघींना म्हणाली, ''आता आपण सवती सवती असलो, तरी बहिणी बहिणीच आहोत असे समजा.'' आणि मग त्या तिघीजणी राजपुत्र ताज-उल-मुल्कबरोबर सुखाने नांदू लागल्या.



भाग २०

## इंद्राचा शाप

स्वर्गाची राजधानी अमरावती असून तेथे इंद्र राज्य करीत असतो. सर्व देव त्याच्या ताब्यात आहेत. सर्व जग त्याच्या अंकित आहे. तो रात्रंदिवस नाचगाण्यात गुंग असतो. सर्व पऱ्या त्याच्या दरबारात नाचत-गात असतात.

असाच एके दिवशी इंद्राच्या दरबारात पऱ्यांचा नाच चालला असताना, इंद्रदेव एकदम म्हणाले, ''परी गुलबकावली बऱ्याच दिवसांत दिसत नाही ते ? ती दरबारात का येत नाही ? त्याचे कारण काय आहे ?''

एक परी म्हणाली, ''महाराज! गुलबकावली परीने एका माणसाबरोबर लग्न केले आहे. ती प्रेमामृत पिऊन धुंद झालेली असते. आमच्याकडे तर ती पाहातसुद्धा नाही.''

हे ऐकून इंद्र क्रोधायमान झाला. त्याने एकदम आज्ञा केली की जा, आताच्या आता तिला कैद करून माझ्यासमोर हजर करा.

पऱ्यांनी विमान घेतले आणि त्या ताजच्या बगिचात येऊन दाखल झाल्या. काही पऱ्या गुप्त रीतीने गुलबकावलीच्या रंगमहालात गेल्या. तिला झोपेतच उचलून त्या तिला बागेत घेऊन आल्या. तेथे त्यांनी तिला जागे केले व इंद्रसभेतील सर्व वृत्तांत तिच्या कानावर घातला.

गुलबकावली भ्याली. ती तशीच विमानात जाऊन बसली आणि विमान सुरू झाले. ती भीतभीतच इंद्राच्या सभेत गेली व तिने इंद्रमहाराजांना नमस्कार केला.

तिला पाहून इंद्र एकदम खवळला आणि त्याने आज्ञा केली की, तिला आताच्या आता अग्निकुंडात टाका. तिचे भस्म होईल. नंतर तिला फिरून जिवंत करू. मग ती नवरूप घेईल. ती मानवाच्या हाताच्या स्पर्शाने कलंकित झाली आहे. ह्या अग्निदिव्याने ती शुद्ध होईल.

पऱ्यांनी तिला उचलून ताबडतोब अग्निकुंडात टाकले. क्षणात तिचे भस्म झाले. नंतर त्यांनी मंत्राने सिद्ध केलेले जल तिच्या रक्षेवर शिंपडले. ती ताबडतोब जिवंत झाली. लगेच तिचा इंद्रसभेत नाच झाला. तिच्या नाचगाण्यावर इंद्र खूष झाला. त्याने तिला एक हार बक्षीस दिला आणि दरबारातून सुटी दिली.

ती पुन्हा विमानात बसून एका क्षणात आपल्या बागेत आली आणि पुन्हा राजपुत्राच्या जवळ जाऊन झोपली.

आता मात्र इंद्राच्या आज्ञेवरून तिला दररोज अमरावतीला जावे लागे. ती विमानातून तेथे जाई, अग्निकुंडात जाळून घेई आणि इंद्र मंत्रसिद्ध पाणी शिंपडून पुन्हा तिला परीचे रूप देई. तेथील नाचगाण्याचा कार्यक्रम संपला की, पुन्हा ती विमानाने परत येई व पतीच्या शेजारी जाऊन झोपून राही.

असे दररोज सुरू झाले. गुलबकावली दररोज आपल्या शरीराचे सगळे हाल सहन करी, पण तिने नाचगाणे कधी चुकविले नाही आणि आपल्या प्रियकराची सेवाही चुकविली नाही. पण एके दिवशी राजपुत्राला रात्री जाग आली. पाहतो तो दोन्ही राण्या झोपल्या आहेत पण गुलबकावली मात्र नाही. ती कुठे गेली असावी बरे? हा विचार करीत तो झोपला. त्याला पुन्हा झोप लागली. सकाळी उठून पाहतो तो गुलबकावली हजर.

तो तिला काही बोलला नाही, पण दुसऱ्या रात्री मात्र त्याने झोपेचे सोंग घेतले आणि गुलबकावलीवर पाळत ठेवण्याचे ठरविले.

रात्री गुलबकावली उठली व बागेत आली. ताजही तिच्या मागे लपत छपत आला आणि एका झाडाआड लपला. पाहतो तो ती एका विमानात बसली आणि ते विमान आकाशमार्गाने उडून गेले.

हा सर्व प्रकार पाहून त्याला फार नवल वाटले. हा काय प्रकार आहे याचा त्याला उलगडा होईना. शेवटी दुसऱ्या दिवशी आपणही त्या विमानात बसून जावे, म्हणजे सगळे काही कळेल, असे त्याने ठरविले.

दुसऱ्या दिवशी शिकारीला जातो असे सांगून राजपुत्र दिवसाच कुठेतरी निघून गेला. संध्याकाळी तो ज्या ठिकाणी

रात्री ते विमान उतरत असे तेथील फुलवेलींच्या जाळीत लपून बसला.

मध्यरात्री विमान उतरले आणि पऱ्या गुलबकावलीला आणायला महालात गेल्या. इकडे ताज गुपचूप त्या विमानाच्या एका कप्प्यात आडवा पडून लपून बसला. त्या पऱ्या आल्या व गुलबकावलीला विमानात बसवून घेऊन गेल्या. आज राजपुत्रही त्यांच्याबरोबर स्वर्गात पोचला.

गुलबकावली व पऱ्या विमानातून बाहेर पडल्या. पाठीमागून ताजही निघाला. बकावलीने प्रथम एका अग्निकुंडात उडी टाकली. तिचे भस्म झाले. इंद्राने तिच्या भस्मावर मंत्रजल शिंपडून तिला जिवंत केले. मग ती इंद्रसभेत नाचली व गायिली. नाचगाणे संपताच ताज आधीच विमानात येऊन लपून बसला. गुलबकावलीला घेऊन विमान पृथ्वीवर उतरताच ताज गुपचूप विमानातून उतरून महालात जाऊन पलंगावर झोपला.

आता मात्र राजपुत्र त्या विमानात लपून बसून वारंवार इंद्रसभेत जाऊ लागला. एके दिवशी गुलबकावलीचा नाच चाललेला होता आणि पखवाजजी बिचारा म्हातारा असल्यामुळे अगदी थकून गेला होता. त्यामुळे त्याची थाप बरोबर पडत नव्हती. राजपुत्र त्याच्याजवळ गेला नि म्हणाला, ''पखवाजजी, मी पण ह्या कलेत तरबेज आहे. जरा मला संधी देता का?'' पखवाजजीने ताबडतोब पखवाज त्याच्या हाती दिला. मग नाचाला पुन्हा रंग भरला. इंद्र इतका खूष झाला की, त्याने आपल्या गळ्यातील नवलाखांचा हार गुलबकावलीच्या अंगावर फेकला व तिला भेट दिला. तिने तो हार पखवाजजीच्या अंगावर फेकला आणि तो दरबार संपला.

दोघेही आपल्या ठरल्या पद्धतीने परत आली आणि एकमेकास नकळत तशीच झोपली.

दुसऱ्या दिवशी सकाळी ताज म्हणाला, ''हे गुल, अग मला रात्री एक फार विचित्र स्वप्न पडले.'' तो ते स्वप्न तिला सांगू लागला. ''अर्धरात्रीची वेळ होती. त्यावेळी तीन-चार पऱ्या तुला उठवायला आल्या होत्या. त्या तुला घेऊन आपल्या बागेत गेल्या. तेथे त्यांनी तुला विमानात बसविले आणि त्या तुला घेऊन गेल्या. तुमच्या नकळत मीही विमानात बसलो.''

अशाप्रकारे अमरावतीत घडलेली सगळी कथा राजपुत्राने गुलबकावलीला कथन केली नि म्हणाला, ''तुझ्या नृत्यावर खूष होऊन इंद्रदेवाने तुला नऊ लाखांचा हार भेट दिला आणि तो तू माझ्या स्वाधीन केलास. हा घे तुला मिळालेला हार.'' त्याने उशाखालील हार काढून गुलबकावलीच्या स्वाधीन केला.

तो हार पाहून व ती हकीकत ऐकून गुलबकावली सुन्न झाली. ती म्हणाली, ''आपण असे केले नसते तर फार बरे झाले असते. आता आपणाला इंद्रसभेत न नेले तर चालणार नाही. कारण मग पखवाज कोण वाजवणार ?''

दुसऱ्या रात्री ती दोघे नेहमीच्या पद्धतीने इंद्रदरबारात पोचली. गुलबकावली नाचू लागली. ताजनेही पखवाजजीकडून पखवाज मिळविला व वाजवू लागला. गुलबकावलीने नाचात आपली कमाल दाखविली. आज इंद्रराज इतका खूष झाला की तो म्हणाला, ''हे गुलबकावली, मी आज तुझ्यावर फार खूष झालो आहे. तर तू हवे ते मागून घे. जे मागशील ते मी देईन.''

गुलबकावली म्हणाली, ''देवाधिदेवा, ह्या दासीला आपल्या कृपेने सगळी सुखे आहेत. पण आपण म्हणताच तर मागणे मागते. हा पखवाजजी मला देऊन टाकावा.''

बकावलीची ही मागणी ऐकताच इंद्र कोपला व म्हणाला, ''हे पखवाजजी, मी तुला केव्हाच ओळखले. तू माणूस आहेस.'' मग इंद्र गुलबकावलीला म्हणाला, ''मी तुला शब्द दिला आहे म्हणून मी तुला हा माणूस देतो, पण... पण तुला शापही देतो. तुझे कमरेपासूनचे अर्धे शरीर दगडाचे होईल व वरचे शरीर तसेच राहील. बारा वर्षे तुझी ही अवस्था राहील.''

इंद्राने ही शापवाणी उच्चारली व सभा बरखास्त केली. बकावली तेथेच गुप्त झाली.

❋ ❋ ❋

## भाग २१

## राजपुत्रावर संकट

गुलबकावली नाहीशी झाली आणि राजपुत्र ताज तेथेच रडायला लागला. तेव्हा पऱ्यांनी त्याला घेतले आणि स्वर्गातून फेकून दिले. तो पृथ्वीवर एका अरण्यात पडला. तीन दिवस तो बेशुद्ध पडून होता. चौथ्या दिवशी तो शुद्धीवर आला आणि बकावली, बकावली म्हणत भटकत राहिला.

भटकता भटकता तो एका संगमरवराच्या तलावापाशी आला. भोवताली घनदाट झाडी होती. त्या झाडांना खूप फळे लागली होती.

राजपुत्राने तेथील फळे खाल्ली, तो त्या तलावाचे पाणी प्यायला आणि एका झाडाखाली विश्रांतीसाठी पडला. इतक्यात तेथे एक पऱ्यांचे विमान आले. विमानातून काही पऱ्या उतरल्या व त्या तलावात स्नान करू लागल्या. त्या पऱ्या इंद्राच्या सेवेतील होत्या. राजपुत्र त्यांना पाहून रडू लागला आणि हात जोडून म्हणाला, ''हे दयाळू पऱ्यांनो, माझी गुलबकावली कोठे आहे ते मला सांगाल काय? माझ्यावर दया करा आणि तिचा ठावठिकाणा मला सांगा.''

त्या पऱ्यांनी राजपुत्राला ओळखले. त्यांना त्याची दया आली. त्या म्हणाल्या, ''गुलबकावली सिंहलद्वीप बेटातील एका देवळात पाषाण होऊन पडली आहे. ते देऊळ दिवसा बंद असते पण रात्री मात्र उघडते.''

राजपुत्र म्हणाला, ''हे देवींनो, हे द्वीप कुठे आहे? किती दूर आहे?''

एक परी म्हणाली, ''ते बेट शेकडो कोस दूर आहे. तुला तेथे पायी जाऊन पोहोचणे तर अशक्यच आहे.''

हे ऐकून राजपुत्र फार निराश झाला आणि रडत रडत दगडाने आपले डोके फोडून घेऊ लागला.

त्या पऱ्यांना त्याची दया आली. त्यांनी त्याला विमानात बसविले व एका क्षणात सिंहलद्वीपात देवळापाशी नेऊन सोडले. आणि त्या परत अमरावतीला निघून गेल्या.

अर्ध्या रात्री त्या देवळाचा दरवाजा आपोआप उघडला आणि राजपुत्र आत शिरला. अर्धी पाषाणाची व अर्धी परीच्या देहातील गुलबकावली त्याच्या नजरेस पडली. त्यांची नजरभेट झाली. दोघांच्या डोळ्यांतून अश्रू वाहू लागले. रात्रभर तो त्या देवळात होता. सकाळ होण्याची वेळ आली तेव्हा गुलबकावली ताजला म्हणाली, ''हे प्राणसख्या, आता

तू येथून जा. येथेच सकाळ झाली तर तूही माझ्यासारखाच होऊन पडशील.'' मग राजपुत्र शहरात निघून गेला.

एके दिवशी तो त्या शहरातून फिरत असताना एक बरीच मोठी टोळी त्याच्या नजरेस पडली. त्या टोळीतील सर्व लोक बोडके आणि पायात काही नसलेले होते. अंगावर त्यांनी कफन्या घातल्या होत्या.

हा काय प्रकार आहे म्हणून ताजने तेथील लोकांना विचारले. त्यावर ते म्हणाले, ''हे सगळे शाहजादे, राजपुत्र, अमीरपुत्र आहेत. ते सर्व प्रेमवेडे आहेत. येथील राजा चित्रसेन ह्याची कन्या अत्यंत सुंदर व लावण्यवती आहे. तिला पाहून हे सर्व वेडे झाले आहेत, पण तिने कोणालाच पसंत केलेले नाही.''

एके दिवशी संध्याकाळी राजपुत्र त्या राजकन्येच्या महालाजवळून जात होता. महालाच्या खाली त्या प्रेमवेड्या तरुणांची टोळी उभी होती आणि वर पाहात होती. महालाच्या खिडकीतून राजकन्या त्या प्रेमवेड्या तरुणांचे हे हाल केवळ गंमत म्हणून पाहात होती.

हा खेळ पाहात ताज जरा वेळ तेथे थांबला आणि त्याच वेळी त्या राजकन्येची नजर ताजकडे गेली. तो राजबिंडा तरुण पाहून ती त्याच्यावर मोहित झाली. नयनबाणाने तिचे हृदय विदीर्ण झाले. प्रेमशराने ती जखमी झाली आणि बेशुद्ध होऊन पडली.

तिच्या दासी धावत आल्या. त्यांनी तिच्या तोंडावर गुलाबपाणी शिंपडले. अत्तर हुंगविले. थोड्यावेळाने ती शुद्धीवर आली. कारण विचारले असता राजकन्या काही सांगेना.

निर्मल नावाची तिची दासी फार हुशार होती. ती खिडकीजवळ गेली व तिने खाली पाहिले. तेथे अनेक प्रेमवेडे होते. त्यांना पाहून तर राजकन्या नक्कीच बेशुद्ध होणार नाही हे तिने ओळखले. तिने इकडेतिकडे निरखून पाहिले तोच तिची नजर ताज-उल-मुल्कवर गेली. तो सुस्वरूप तरुण पाहताच राजकन्येच्या बेशुद्ध होण्याचे कारण तिने ओळखले.

राजकन्या ताजवर अगदी मोहून गेली होती. तिचे ख़ाण्यापिण्यावरील लक्षही उडाले होते. त्यामुळे ती कृश होऊ लागली. होता होता ही गोष्ट चित्रसेन राजाच्या कानावर गेली.

चित्रसेन राजाने राजपुत्राला पाहिले व तोही त्याच्या सौंदर्यावर खूष झाला. त्याने आपली चांगली परिचित स्त्री पाठवून त्या प्रवाशाचे मन वळविण्याचा प्रयत्न केला. ती ताजला म्हणाली, ''राजकन्येबरोबर तुझा विवाह व्हावा या हेतूने राजा तुला आमंत्रित करीत आहे. अनेक राजपुत्र जिच्यासाठी वेडे झाले आहेत अशी सुंदर राजकन्या तुला प्राप्त होण्याची वेळ आली आहे. तर तू ही संधी घालवू नकोस.''

राजपुत्र म्हणाला, ''मी प्रवासी माणूस. मी फक्त प्रदेश पाहण्यासाठी बाहेर पडलो आहे. मला लग्न वगैरे कर्तव्य नाही असा निरोप तू राजाला सांग.''

हे उत्तर एकून राजा चिंतेत पडला. त्याने ही गोष्ट आपल्या प्रधानाला सांगितली. प्रधान म्हणाला, ''महाराज, आपण निश्चिंत राहावे. मी करतो ती व्यवस्था, पण मला सर्व तऱ्हेने संमती दिली पाहिजे.''

तेथे बरेच दिवस राहिल्याने राजपुत्राला पैशाची अडचण भासू लागली. नाइलाजाने त्याने आपल्या मांडीतील मणी काढून विकायचे ठरविले. त्याने मांडी चिरून मणी बाहेर

काढला. जखम बरी होईपर्यंत तो कोठे फिरकला नाही. नंतर तो सर्पमणी विकण्यासाठी जवाहिऱ्यांकडे फिरू लागला.

त्याच्या पाळतीवर प्रधानाचे गुप्तचर होतेच. त्यांनी त्याला पकडले आणि राजाच्या रत्नघरातील चोरीला गेलेला एक भारी किंमतीचा मणी तो हाच आहे आणि तो तू चोरला आहेस, असा त्याच्यावर आरोप ठेवून त्याला कैद केले. त्यांनी राजाला कळविले की, महाराज, जो पक्षी हवा होता त्याला पकडले आहे.





भाग २२

## चित्रावतीबरोबर विवाह



राजाने राजपुत्राचे कैदेत फार हाल सुरू केले. तो त्याला सारखा म्हणत होता की, राजकन्या चित्रावतीबरोबर तू विवाह कर. पण राजपुत्र काही तयार होईना. तो गुलबकावलीचा सारखा ध्यास करीत होता. त्याने अन्नपाणी सर्व सोडून दिले.

कैदखान्याच्या अधिकाऱ्याने ही गोष्ट राजाच्या कानावर घातली. त्या कैद्याला जर सोडले नाही, तर तो लवकरच मरून जाईल असे त्याने कळविले.

राजा त्याला काहीएक न सांगता सरळ राजकन्येच्या महालात गेला आणि तिला म्हणाला, ''तुझा तो मुशाफिर काही केल्या लग्नाला तयार होत नाही. आता तूच त्याच्याकडे जा आणि प्रयत्न कर.''

राजकन्येला हा विचार अगदी पसंत पडला. ती खूष झाली व साजशृंगार करून आपल्या दोघा मैत्रिणींना घेऊन कैदखान्यात त्या प्रवाशाला भेटायला गेली.

पण त्याने त्यांच्याकडे ढुंकूनही पाहिले नाही. आपला प्रयत्न अयशस्वी होणार असे राजकन्येला वाटले. तिला फार वाईट वाटले. ती एकदम बेशुद्ध झाली आणि धाडकन जमिनीवर पडली.

इकडे राजपुत्र दचकून उठला. त्याने तिला उचलून मांडीवर घेतले व वारा घालून, डोळ्यांना पाणी लावून तिला शुद्धीवर आणले.

ती बडबडू लागली, ''हाय रे देवा. आता माझे कसे होईल ? मी जगू तरी कशाला व कुणासाठी ?'' आणि ती अधिकच शोक करू लागली. तेव्हा राजपुत्राने लग्नाला संमती दिली.

लवकरच मोठ्या थाटामाटाने राजकन्या चित्रावती आणि ताज-उल-मुल्क ह्यांचे लग्न पार पडले. राजाने त्यांची एका स्वतंत्र महालात राहण्याची सोय केली.

लग्नाच्या दुसऱ्याच दिवशी मध्यरात्री राजपुत्र उठला व गुलबकावलीच्या मंदिरात गेला. बरेच दिवसांत भेट नव्हती म्हणून दोन्ही जीव तळमळत होते. भेट होताच त्यांना फार आनंद झाला. इतके दिवस न येण्याचे कारण त्याने गुलबकावलीला सांगितले. आपल्या कैदेची व लग्नाची खरी हकीकत तिला कथन केली. ती ऐकून गुलबकावलीला त्याची दया आली. मग तो दिवस चित्रावतीच्या सहवासात व रात्र गुलबकावलीच्या सहवासात घालवून दिवस कंठू लागला. राजपुत्र रात्री उठून कुठेतरी जातो ही गोष्ट चित्रावतीच्या तेव्हाच लक्षात आली आणि तिने ती वडिलांच्या कानावर घातली.

राजाने जिकडेतिकडे गुप्तहेर ठेवले आणि रात्री राजपुत्र कोठे जातो ह्याचा शोध चालविला. दुसऱ्याच दिवशी राजाला अशी खबर मिळाली की, रात्री राजपुत्र दक्षिणेकडील एका नवीनच झालेल्या मंदिरात जातो व रात्रभर तेथे राहून सकाळी तेथून परततो.

राजाने शेकडो मजूर लावले आणि पाहता पाहता ते देऊळ खोदून काढून त्याचे सर्व साहित्य नदीत फेकून दिले.

रात्री राजपुत्र तेथे आला आणि पाहतो तो तेथे देऊळ नाही. तो एकदम हंबरडा फोडून रडायला लागला. तो सर्व नदीकिनारा भटकला आणि हे प्राणप्यारी, हे हृदयेश्वरी मला भेट दे असे वेड्यासारखे बडबडू लागला. तो बरेच दिवस गुलबकावलीच्या चिंतनात मग्न होता; पण हळूहळू त्याचे दुःख कमी होत गेले व तो चित्रावतीबरोबर रममाण होऊ लागला.





भाग २३

## गुलबकावली व राजपुत्र यांची पुन्हा भेट



देऊळ नष्ट झाले तरी राजपुत्र तेथे येई व त्या जागेवर शोक करीत बसे. पुढे ती जमीन एका शेतकऱ्याने नांगरली व तेथे राई पेरली. ते शेत चांगले पिकले. ताज त्या शेताची ती हिरवीगार शोभा पाहण्यासाठी दररोज दोन वेळा येऊ लागला.

त्या शेतातील राई पक्की झाल्यानंतर शेतकऱ्याने त्या राईचे तेल काढले. त्याने व त्याच्या बायकोने ते तेल खाण्यासाठी वापरले. शेतकऱ्याच्या बायकोला मूलबाळ काहीच नव्हते.

पण ती आता गरोदर राहिली व नऊ महिन्यांनी तिला एक सुंदर रूपवती कन्या झाली.

मुलगी हळूहळू वाढू लागली आणि तिच्या सौंदर्याची कीर्तीही दाही दिशांना पसरली. राजपुत्राच्या कानावर ही गोष्ट गेली.

राजपुत्राने शेतकऱ्याला मुलीला घेऊन बोलाविले. त्याने जेव्हा त्या मुलीला पाहिले, तेव्हा तो आश्चर्यचकित झाला. ती हुबेहूब गुलबकावलीसारखी होती. गुलबकावलीनेच ह्या मुलीच्या रूपाने जन्म घेतला आहे अशी त्याची खात्री झाली. राजपुत्राने एक मोठी पिशवी मोहरांनी भरून त्या शेतकऱ्याला दिली आणि तो म्हणाला, "ह्या मुलीचे संगोपन उत्तम कर. तिला काहीही कमी पडू देऊ नकोस. तुला लागले तर माझ्याकडून आणखी द्रव्य ने -"

ती मुलगी सात वर्षांची झाली. तिला मोठमोठ्या मागण्या येऊ लागल्या. एके दिवशी राजपुत्राचा त्याच्याकडे निरोप गेला की, तू आपली कन्या मला दे. मी तिच्याबरोबर लग्न करायला तयार आहे.

निरोप ऐकताच शेतकरी घाबरला. तो म्हणाला, "अरे देवा, राजाच्या जावयाला मी मुलगी कशी देऊ? मुलगी बिचारी आयुष्यभर दासी होऊन राहील. आता मी काय करू?"

पण त्याचवेळी ती मुलगी म्हणाली, "बाबा, तुम्ही चिंता करू नका. मी गुलबकावली नावाची एक परी आहे. मी तुमच्या पोटी जन्म घेतला आहे. सध्या राजपुत्राला निरोप पाठवा की, काही दिवस थांबा. मी मोठी झाले म्हणजे तुमच्याच गळ्यात माळ घालणार आहे."

एके दिवशी लाखो पऱ्या सिंहलद्वीपात उतरल्या. त्यातील सुमनपरी त्या शेतकऱ्याच्या कन्येजवळ गेली. आपण आणलेला भारी किंमतीचा पोशाख तिने तिच्या अंगावर चढविला आणि तिला म्हणाली, ''हे गुलबकावली! चल आता तू. तुझ्यासाठी विमान आणले आहे.''

गुलबकावलीने तो पोशाख चढविला. त्यावेळी ती अधिकच सुंदर दिसत होती. ती मातापित्यांना म्हणाली, ''मी तुमच्या घरी थोड्या दिवसांची पाहुणी होते. तुम्ही माझे चांगले लालनपालन केले. आता मी जाते. ही माझी मैत्रीण सुमनपरी मला न्यायला आली आहे.''

नंतर तिने वडिलांना मागच्या वाड्यात नेले आणि एका कोपऱ्यातला कोणास माहीत नसलेला मोहरांचा हंडा दाखविला व म्हणाली, ''ह्या मोहरा खर्च करा आणि सुखाने राहा -''

मग त्या पऱ्या गुलबकावलीला विमानात बसवून घेऊन गेल्या. तिचा बारा वर्षांचा शापकाल संपला व तिचा उद्धार झाला.

पऱ्यांनी तेथून विमान उडविले, ते ताज-उल-मुल्कच्या महालाच्या गच्चीवर. त्यावेळी ताज-उल-मुल्क व चित्रावती ही गच्चीवर गप्पागोष्टी करीत बसली होती.

गुलबकावलीला पाहताच राजपुत्र उठला व त्याने तिच्या गळ्याला मिठी मारली. दोघांच्याही नयनांतून अश्रुधारा वाहू लागल्या. मग गुलबकावलीने राजकन्येला आलिंगन दिले आणि म्हणाली, ''हे चित्रावती, तुला जर तुझा पती प्रिय असेल तर तू आमच्याबरोबर चल. मी तुला माझी भगिनी मानून माझ्या प्रेमाचा वाटा तुलाही द्यायला तयार आहे.''

चित्रावती बकावलीचे ते अप्रतिम सौंदर्य पाहून थक्क झाली. ती म्हणाली, ''गुलबकावली, तुझे हृदय खरोखर थोर आहे. माझ्यामुळे तुला बराच त्रास झाला. तरी मला क्षमा कर.''

इकडे हा सर्व प्रसंग चालू असताना चित्रसेन राजाला हजारो पऱ्या राजकन्येच्या महालावर उतरल्या असल्याची बातमी कळली. तो धावत तिच्या महालात आला. मग ती सर्व मंडळी जरा शांत चित्ताने बसली व राजपुत्र ताज-उल-मुल्कने गुलबकावलीची सगळी हकीकत राजाला सांगितली.

ही कथा ऐकून राजा गुलबकावलीला म्हणाला, ''बेटी, ही चित्रावती माझी एकुलती एक मुलगी आहे. आता ती तुझीच आहे. धाकटी बहीण म्हणून तू तिचा सांभाळ कर.'' मग त्याने चित्रावतीला बकावलीच्या स्वाधीन केले.

गुलबकावलीने चित्रावतीबद्दल राजाला हमी दिली आणि आपल्या दोन सख्यांना बरोबर घेऊन चित्रावती ताजबरोबर जायला निघाली. मोठ्या थाटाने राजा चित्रसेनाने ह्या सर्व मंडळींना निरोप दिला.

ही सर्व मंडळी विमानात बसली आणि विमान आकाशात उडाले. त्या विमानाबरोबर हजारो पऱ्या आकाशात उडाल्या. तेव्हा पऱ्यांनी सगळे आकाश भरून गेले होते. त्यावेळी शहरातील सर्व लोक हे नयनमनोहर दृश्य पाहण्यात गुंग झाले होते.

थोड्याच वेळात विमान निगारीन नगरीत राजवाड्याच्या बगिचात उतरले. राजपुत्र विमानातून आपल्या दोन्ही राण्यांसह खाली उतरला. मग त्या पऱ्या विमान घेऊन इरमला रवाना झाल्या.

इकडे ताज-उल-मुल्क आपल्या जुन्या राण्या दिलवर व महमुदा ह्यांना भेटला. ताजला पाहताच त्या दोघींना अत्यानंद झाला व त्या त्याच्या गळ्यात पडल्या.

सर्व नगरीत राजपुत्र ताज-उल-मुल्क आल्याची बातमी कळली व जिकडेतिकडे आनंदीआनंद झाला.





भाग २४

## जिकडे तिकडे आनंदीआनंद



अनेक संकटे सोसून राजपुत्र निगारीनला येऊन पोहोचला आणि त्याने आपण कोणत्या प्रकारची संकटे भोगली व त्यातून कशा प्रकारे निभावून घरी सुखरूप येऊन पोहोचलो त्याबद्दलची सविस्तर माहितीची पत्रे आपल्या आप्तेष्टांना लिहून पाठविली. ती पत्रे वाचून सर्वांना आनंद झाला आणि त्याला भेटण्यासाठी फेरोजशहा व जमिलाखातून, तसेच मुझफ्फरशहा व हुस्नआरा आपली कन्या रूहअफजासह येऊन पोहोचली. बादशहा झैन-उल-मुल्कही आपले वजीर घेऊन येऊन पोहोचला.

ताज-उल-मुल्कला पाहून सर्व आप्तेष्टांना आनंद झाला.

आगत-स्वागताचे थोडे दिवस निघून गेल्यावर जो तो आपापल्या वतनाला निघून गेला. नंतर राजपुत्र ताज-उल-मुल्क आपल्या चार राण्यांसह राजधानी शिरकस्तानला आला. बादशहा झैन-उल-मुल्कला फार

आनंद झाला. राजपुत्राच्या आईला तर प्रेमाचे भरते आले. सर्वांना आनंद वाटला.

बादशहा आता खूप म्हातारा झाला होता. मुलाची कर्तबगारी पाहून बादशहाने राजपुत्र ताजला गादीवर बसविले आणि सर्व राज्य त्याला दिले. राजपुत्र ताज आपल्या चारी राण्यांसह तेथे राज्य करू लागला. सर्वत्र आनंदीआनंद झाला.




**प्रकाशक :**
जय हिंद प्रकाशन
१० बी-झावबा वाडी,
मुंबई-४०० ००२.

**नवीन आवृत्ती :**
जानेवारी १९९८

**लेझरसेटिंग :**
अक्षय फोटोटाइपसेटर्स
'कुलदीपक', सुभाष पथ,
ठाणे-४०० ६०१.

**मुखपृष्ठ :**
पुंडलिक वझे

**आतील चित्रे :**
पुंडलिक वझे

जयहिंद प्रकाशन

प्रकाशक : रायकर ब्रदर्स पब्लिशिंग हाऊस प्रा. लि.,
२१२, क्रिएटिव्ह इंडस्ट्रियल सेंटर, ना. म. जोशी मार्ग,
लोअर परेल, मुंबई -४०० ०११.
दूरध्वनी : २३०७ ५८६७, २३०७ ५८९९

नवीन आवृत्ती : फेब्रुवारी २०१३

छपाई :
मुद्रण अविष्कार,
१९४-एम्, कात्रक कंपाऊंड,
गायवाडी, गिरगांव, मुंबई-४०० ००४.

लेझरजुळणी :
अक्षय फोटोटाईपसेटर्स,
'कुलदीपक', जुन्या महानगरपालिकेजवळ,
सुभाष पथ, ठाणे - ४०० ६०१.